






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

किंमत ५ रुपये

वर्ष-८
अंक-२८

**मानवी आक्रमक प्रवृत्ती ( ९ )**

अँथनी स्टोर व कोनराड लॉरेंझ यांच्या ग्रंथावरून

**कला-काही विचार**

**कला-युंग, रँक आणि कलाविचार**

विश्वास पाटील

**लोककला आणि लौकिककला ( ६ )**

अर्नोल्ड हॉझेर

अनुक्रमणिका



वर्ष सातवे
अंक २७ वा

जु. ऑ. स. ७५



संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील

रचना
पामार्ट
मुंबई २८

पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पालखी वाडी
१३, काशीनाथ धुरु रोड मुंबई २८

मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४

वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

या अंकाची
किंमत रु. ४

मालक : सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४

मुद्रण स्थळ :
विमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, यांचा विमा छापखाना.
४१५ ००२

# अनुक्रमणिका

**मानसशास्त्र**

**मानवी आक्रमक प्रवृत्ती (९) :**
अँथनी स्टोर व कोनराड लॉरेंझ
यांच्या ग्रंथावरून

**कला–काही विचार**

**कला–युंग, रँक आणि कलाविचार**
—विश्वास पाटील

**समाज आणि संस्कृती**

**लोककला आणि लौकिककला (६) :**
—अर्नोल्ड हाँझेर

## संपादकीय :

नवी क्षितिजेचा हा सत्ताविसावा अंक

या अंकातला 'कला–काही विचार' हा लेख आपणास आवडावा काही नवी दृष्टी देण्याचा प्रयत्न त्यात आम्ही केला आहे. एकच कलाकृती पण वेगवेगळ्या वेळी ती वेगवेगळी भासते. असे का? याचा विचार त्या लेखात आहे.

एखाद्या कलाकृतीला विशिष्ट आशय कसा प्राप्त होतो? मानवी उत्क्रांतीचा व त्या आशयाचा काही संबंध असू शकतो काय? कलाकृतींच्या संबंधात असे अनेक बारीकसारीक प्रश्न नेहमी आपणास पडतात. युंग आणि रँक या दोन प्रख्यात मानसशास्त्रज्ञांच्या तात्विक बैठकीच्या अनुषंगाने या प्रश्नांचा उहापोह येथे आपणास सापडेल.

'नवी क्षितिजे'च्या वाचकांना हे दोन्हीही लेख आवडतील अशी अपेक्षा.

—संपादक

अनुक्रमणिका

## मानवी आक्रमक प्रवृत्ती ( १ ) :

( अँथनी स्टोर व कॉनराड लॉरेंझ
यांच्या ग्रंथावरून )

लांडगा लांडग्यासारखा वागतो. सिंह सिंहासारखा. वाघ वाघासारखा थोडक्यात प्रत्येक प्राणी त्याच्या त्याच्या प्रकृतिधर्माप्रमाणे वागतो. हा प्रकृतिमध त्याच्या ठिकाणी आनुवंशिकतेने येतो. प्राणी त्यांच्या त्यांच्या स्वाभाविक प्रकृति-धर्माप्रमाणे वागत असले तरी माणसाने मात्र स्वतःच्या विवेचकवुद्धीप्रमाणे वागावे अशी अपेक्षा आपण धरतो. तथापी आपल्या असेही पाहण्यात येते की माणसेसुद्धा जेव्हा त्यांच्या उपजत प्रेरणेप्रमाणे वागतात तेव्हा कधी कधी त्यांचा फार मोठा फायदा होतो. उदा. आपल्या स्वतःच्या वा आपल्या प्रिय व्यक्तीच्या जीवावर बेतले की माणूस रागाने बेभान होऊन काय वाटेल ते करावयास प्रवृत्त होतो आणि अशा वेळी या रागाचा फायदा मिळून त्याच्यावरचे, त्याच्या आवडत्या व्यक्तीवरचे ते संकट दूर होते. किंवा स्वतःचे राष्ट्र, स्वतःच्या देवदेवता, कुटुंब, भाईवंद, स्वतःची वा राष्ट्राची मानचिन्हे यांचा कुणी अनादर केला तरिही भडकून उठून तसे करणाराचा प्रतिकार करण्याची प्रवृत्ती माणसामध्ये आढळते नि या प्रवृत्तीमुळे माणसाचे स्वतःचे व त्याच्या जमातीचे जीवितरक्षण होत असते. या सर्व प्रसंगांचा विचार करता असेही वाटू लागते की बऱ्यावाईट परिणामांची क्षिती न बाळगता मनात आलेल्या संतापाने समोरील संकटावर तुटून पडणे हीसुद्धा एक आवश्यक बाब आहे. थोडक्यात माणसाच्या ठिकाणी जो सामूहिक त्वेषाची प्रवृत्ती दिसते तीसुद्धा जातीउपकारक आहे. हा सामुदायिक त्वेष जर माणसाच्या ठिकाणी नसता तर आपले जातभाई संकटात सापडल्याचे पाहुनही माणूस त्यांचे मदतीसाठी धावून गेला नसता. किंवा स्वतःच्या मानचिन्हांसाठी प्राणपणाने तो लढला नसता. तर एका दृष्टीने पाहाता सामुदायिक लढाऊपणाची वृत्ती मानवी जीविताला उपकारक ठरली आहे असे म्हणावे लागते. पण दुसऱ्या बाजूने याच प्रवृत्तीचा विचार केला तर असेही दिसून येते की हीच प्रवृत्ती जातीजातीत, राष्ट्राराष्ट्रात फूटही पाडीत आहे. एका धर्माची माणसे दुसऱ्या धर्माच्या लोकांच्या सद्भावनांचा संशय घेतात. एक जात दुसऱ्या जमातीबद्दल अविश्वास दाखविते. थोडक्यात जे जातीने, धर्माने, विचाराने आपल्यापैकी नाहीत

असे आपणांस वाटते त्यांच्या हालचालीविषयी आपल्या मनात नेहमी किंतू असतो. आणि याचे कारण आपल्या मनातला सामुदायिक झुंजार आवेश. या आवेशाने माणसे जवळ येतात. तशीच तो एकमेकापासून दूरही ठेवली जातात. सामुदायिक आवेशाच्या बाबतीत सर्वांत वाईट बाब ही आहे की प्रत्यक्ष घडामोडीच्या दर्शनाने जसा हा आवेश उत्तेजित होतो तशाच प्रकारे निव्वळ कल्पनाशक्तीच्या चाळवाचाळवीनेही तो उत्तेजित होऊ शकतो. म्हणजेच प्रत्यक्ष अन्यायाच्या दर्शनाने तो उत्तेजित होऊ शकतो तितकाच अन्याय होणार वा अन्याय झाला आहे या आरडाओरडीनेही तो उत्तेजित होऊ शकतो. किंवा अन्याय होणार या नुसत्या घबराटीनेही तो उत्तेजित होऊ शकतो. थोडक्यात केवळ संकेतचिन्हांपायीही तो चाळवू शकतो. सामुदायिक आवेशाचा तिसरा वाईट गुणधर्म असा की शब्दावर ज्याची चांगली पकड आहे असा इसम त्या शब्दांचा गैरवापर करून आपल्या प्रभावाखालच्या माणसांचा आवेश भडकावू शकतो. म्हणजे शब्दशक्तीच्या मदतीने तो तो आवेश स्वतःला हवा त्याप्रमाणे वापरू शकतो. सामान्य लोकाना एकमेकांविरुद्ध चिथावणी देऊ शकतो. त्यांना अनन्वित कृत्ये करावयास प्रोत्साहन देऊ शकतो. प्रत्यक्ष घडामोडीच नव्हे तर संकेतचिन्हाना आवाहन केल्यानेही झुंजार आवेश उत्तेजित केला जाऊ शकतो हा यातील खरा धोक्याचा भाग आहे.

सामूहिक आवेश केवळ चांगल्याच्याच बाजूने चेतविता येतो असे नव्हे तर वाईट आणि दुष्ट बाजूनेही तो चेतविता, वापरता येतो हे खरे दुर्दैव आहे. बऱ्याचदा सामूहिक आवेशाचा उपयोग गैरकृत्यासाठीच करण्यात आल्याचे आपण पाहतो. एका धर्माचे लोक दुसऱ्या धर्माच्या लोकाना ठार मारतात, त्यांच्या बायकांची अब्रू लुटतात, म्हाताऱ्याकोताऱ्यांचे अनन्वित हाल करतात, मालमत्ता लुटतात, जाळतात, तिचा विध्वंस करतात. या सर्व गोष्टी नेहमी तत्त्वाच्या, धर्माच्या नावाखाली घडून येतात. घडविल्या जातात, आणि या सर्व ठिकाणी सामुदायिक आवेशाचा संबंध पोचतो, सामूहिक त्वेष जागृत करून महान ध्येयाच्या नि विचारांच्या नावाखाली माणूस माणसाचा शत्रू बनतो. व्यक्ती जशी सारासारबुद्धीने विचार करू शकते तसा विचार समुदाय करू शकत नाही. एकदा का माणूस समुदायाच्या गर्दीत शिरला की त्याला बऱ्यावाईटाचे भान राहात नाही. मग समुदाय म्हणेल तेच त्याच्या दृष्टीने सत्य असते. समुदायाचा धर्म तोच त्याचा धर्म-समुदायाचे ध्येय तेच त्याचे ध्येय. म्हणून सामूहिक आवेशाचा विचार करताना हा आवेश प्रकृतीने द्विविध आहे हे सत्य कधीही आपण विसरता कामा नये.

अनेक स्वार्थी आणि लबाड पुढारी शब्दांची भुलावण करून लोकांचा सुप्त झुंजार आवेश जागृत करतात. त्याना भलभलत्या मार्गाला नेतात हे सर्व जाणून आपण आपल्या या वृत्तीवर नियंत्रण ठेवावयास शिकले पाहिजे. ही



अनुक्रमणिका



आवेशी भावना नैसर्गिक प्रकृतीसारखी बनली आहे, म्हणजे चालना मिळताच ती आपोआप उत्तेजित बनते, अशा वेळी तिच्यावर आपल्या विचाराचा ताबा राहात नाही, आणि यातच तिचे धोके लपलेले आहेत. माणसाने जनावराच्या दृष्टीने खूप दूरवर मजल मारली आहे. परंतु अंगभूत शहाणपणाचा विचार करता माणूस अजूनही पशुत्वापासून सुरक्षित अंतरापर्यंत पोचलेला नाही. कारण प्रसंग येताच आजही तो नरपशू बनू शकतो. लढाऊ आवेशाच्या आहारी गेल्यास ध्येय आणि तत्वप्रणालीच्या नावे, मानबिंदूसाठी एक भाऊ दुसऱ्या भावाचा गळा घोटू शकतो. आणि तथाकथित परमेश्वरी सत्याच्या प्रसारासाठी एक धर्म दुसऱ्या धर्मियांचा फडशा पाडावयास उद्युक्त होतो. माणूस हा असा आहे. माणूस कमी, पशू अधिक.

मानवी मनात सुप्तपणे वास करणारा फाजिल आक्रमकपणा कमी करण्याच्या बाबतीत आंतरराष्ट्रीय मैदानी क्रिडास्पर्धांचा उपयोग कितपत होऊ शकतो याचा विचार मागे एकदा येऊन गेलाच आहे. दर चार वर्षांनी भरणारा ऑलिंपिकचा सोहळा हीच कदाचित भिन्नभिन्न राष्ट्रांच्या आयुष्यातली अशी एकमेव वेळ असावी की जेव्हा प्रतिस्पर्धी राष्ट्राचा ध्वज वर जाताना पाहूनही पहिल्या राष्ट्राच्या मस्तकाची शीर तडकत नाही. याचे कारण अर्थात खेळांचे आंतरराष्ट्रीय संकेत, व खेळाडू आणि प्रेक्षक यांच्या अंगवळणी पडून गेलेली सार्वजनिक शिस्त. विशिष्ट ठिकाणी आणि विशिष्ट प्रसंगात का होईना पण माणसे संयमाने वागून आपल्या आक्रमक वृत्तीला आवर घालू शकतात, स्वतःचे राष्ट्र पराभूत होताना पाहूनही तो पराभव खेळाडूपणाने स्वीकारतात. या निरिक्षणावरून मानवी सामाजिक वर्तनासंबंधी काही विशेष निष्कर्ष काढता येतात. तसेच माणसातली स्वाभाविक आक्रमकता कशा प्रकारे काबूत आणता येईल याविषयीही काही उपयुक्त सूचना देता येतात.

तथापी आक्रमक प्रवृत्ती काबूत आणण्यासाठी कोणते उपाय करता येतील याची चर्चा करण्यापूर्वी एक गोष्ट स्वतःच्याच मनाशी आपण मान्य करावयास हवी. ती ही की मनुष्याच्या बाबतीत आक्रमक प्रवृत्ती ही एक अत्यंत स्वाभाविक प्रवृत्ती आहे. किंबहुना आंतरराष्ट्रीय सामुदायिक खेळात जे सामंजस्य आपल्या दृष्टोत्पत्तीस येते त्याचाही उगम माणसाच्या ठिकाणी आढळणाऱ्या याच स्वाभाविक आक्रमकपणात आहे. फक्त नेहमी ही प्रवृत्ती आक्रमक आविष्कारात दिसते. या वेळी तिचा आविष्कार सौम्य असतो. परंतु माणसाच्या अंगी जर मूलतः आक्रमकपणा नसता तर कोठल्याही प्रकारच्या स्पर्धात्मक हालचालीत त्याने भागच घेतला नसता.

मूळ आक्रमक व नकारात्मक प्रवृत्तीचे रूपांतर विधायक सांघिक भावनेत करण्याची किमया माणसाने कदाचित फारफार प्राचीन काळी आत्मसात केली



अनुक्रमणिका

असण्याची शक्यता आहे. प्राचीन काळी माणूस टोळयाटोळयानी राहात होता. या टोळ्या शिकारीवरून, बायकांवरून व मजूर गुलामांसाठी सतत एकमेकांशी झगडत. अशा वेळी टोळकऱ्याना आपल्या भाईवंदांशी जास्तीतजास्त एकोप्याने वागावे लागे; तरच शत्रूचा पाडाव शक्य असे. सहकाऱ्यांबद्दलची निष्ठा प्रेम, आपलेपणा या गोष्टी माणूस त्या आदिम काळात शिकला आहे. नंतरच्या हजारो वर्षांत अनंत्य वेळा फक्त त्याने तो धडा गिरविला. स्वकियांविषयी प्रेम आणि निष्ठा जसा माणूस इतक्या प्राचीन काळी शिकला तशीच सामाजिक श्रेष्ठत्व-कनिष्ठत्वाची कल्पनाही तो शिकला. एकाच कळपात काही लोक अधिकाराने वरिष्ठ असतात तर काही कनिष्ठ असतात. कनिष्ठानी वरिष्ठांच्या आज्ञा पाळाव्यात. त्यातच त्यांचे हित असते.. ही सामाजिक सवय इतक्या प्राचीन काळी माणसाने स्वतःच्या अंगी बाणवली आहे.

एका कळपातल्या लोकांनी एका ध्येयासाठी, परंपरेसाठी झगडावे. जी आपली श्रद्धा मानली ती प्राणपणाने रक्षावी. स्वतःची श्रद्धा रक्षण करताना प्राण द्यावा लागला तरी हरकत नाही. एकमेकाची साथ शेवटपर्यंत करावी. कोठल्याही परिस्थितीत माथोदाराचा विश्वासघात होऊ देता नये. मित्रप्रेम; इमान हे जे गुण आजही आपण आदर्श मानतो त्या गुणांचा पाया त्या काळात घातला गेला. स्वकियांचे प्रेम आणि परकियांचा द्वेष हे जे दोन गुण माणसाने त्या काळात आत्मसात केले त्यांची त्याला त्या काळी आत्यंतिक आवश्यकता होती. कारण प्राणांतिक स्पर्धा हा तेव्हाच्या जीवनाचा एकमेव कायदा होता. नैसर्गिक साधने आजच्यासारखी तेव्हा विकसित झाली नव्हती. धान्य म्हणजे नैसर्गिकपणे जे काय उगवेल ते. नाहीतर श्वापदांची शिकार हेच एकमेव महत्वाचे अन्न. हे अन्नसुद्धा वाटेल तेवढे मिळत नसे. त्यासाठी एकमेकांशी भांडावे लागे. भांडल्यात आम्ही किंवा तुम्ही हेच तेव्हाच्या जीवनाचे एकमेव सूत्र होते. अशा अटीतटीच्या जीवनसंग्रामात वर सांगितले ते गुण लाख मोलाचे असतात.

आज मानवी जीवनाची स्थिती पूर्णतया पालटली आहे. आज नैसर्गिक साधने विपुल नसली तरी भरपूर प्रमाणात उपलब्ध आहेत. तशाच स्वतःच्या हुशारीने माणसाने त्यात भरही घातली आहे. तेव्हा अन्न आणि निवाऱ्यासाठी माणसाने माणसाचा जीव घेण्याची आज काहीच गरज नाही. गुण्यागोविंदाने वागूनही सर्वांचे पालनपोषण आज होऊ शकते, पण तरिही माणूस परस्परांशी आक्रमकतेने वागू पाहातो. अर्थात माणसातल्या लढाऊ आवेशाला आज काही कार्य राहिले नाही असा याचा अर्थ नाही. लढाऊ आवेश आजही अनेक ठिकाणी उपयोगी पडतो. पडू शकेल. कारण हा आवेश ही एक शरिर–मानस ऊर्जा आहे आणि ऊर्जा ही कधीही निरुपयोगी बनत नाही. तिचा मूळ उद्देश बाद होईल परंतु दुसऱ्या वेगळ्या ठिकाणी ती वापरता येईल.

लढाऊ आवेशाची पूर्वीची उद्दिष्टे बाद झाली आहेत. आता त्याऐवजी नवी उद्दिष्टे आपण शोधून काढली पाहिजेत. हे जे लढाऊ आवेशासंबंधीचे नवे सत्य तेच आजच्या माणसाला आजदेखिल उमगू शकलेले नाही. कारण लढाऊ आवेशाच्या बाबतीत आपल्या भावना काहिशा संदिग्ध, द्विधा आहेत. युद्धातल्या वैयक्तिक पराक्रमांचे आपण कौतुक करतो, त्याच वेळी त्याच युद्धात घडून आलेली मनुष्य आणि वित्तहानी पाहून आपण हळहळतोही. युद्धातल्या वैयक्तिक पराक्रमासाठी युद्ध आम्हाला पूर्णतः निरर्थक वाटत नाही, त्यातील एकूण विध्वंस पाहून आम्हाला दुःखही होते. पण दुःख झाले तरी युद्धाची संपूर्ण वैय्यर्थताही आमच्या मनाला पटत नाही, असा आमचा दृष्टीकोन या बाबतीत द्विधा आहे. तो द्विधा आहे कारण मानवी मनातला लढाऊ आवेश इतर चांगल्या प्रकारे कसा वापरता येईल याविषयी फारशा सुस्पष्ट कल्पना आमच्यापाशी नसतात. म्हणून युद्ध आम्हाला नकोही असते आणि हवेही असते.

माणसाच्या अंगी स्वाभाविक लढाऊ आवेश आहे. हा आवेश त्याच्या अंगी उत्क्रांतिक्रमात तयार झाला आहे. या आवेशामुळे त्याच्या जातीचे आजवर रक्षण झाले. या सर्व गोष्टी जरी मान्य केल्या तरी एक प्रश्न असा उरतो की हा आवेश फक्त आपापसातल्या जीवघेण्या लढायातच वापरता येतो की तो इतरही मानवी कर्तृत्वक्षेत्रात वापरला जाऊ शकतो ? जर 'युद्ध हेच एकमेव क्षेत्र या आवेशाच्या वापरासाठी उपलब्ध असेल, जर या आवेशाची शक्ती इतर कोठल्याच वेगळ्या मार्गाकडे वळविता येत नसेल तर मग प्रश्नच मिटला; मग माणसाची जात भूतलावरून नष्ट होईपर्यंत अधूनमधून माणसाला आपापसात झगडत आणि एकमेकांचा जीव घेत राहावे लागेल, परंतु जर या प्रवृत्तीचे नैसर्गिक वळण बदलता येत असेल तर ही प्रवृत्ती कायम टिकूनही मनुष्यजातीला जिवंत राहाता येईल. मला वाटते की लढाऊ आवेशाची प्रवृत्ती जरी नैसर्गिक असली तरी तिचे मूळ वळण आपण बदलू शकतो. युद्धाव्यतिरिक्त इतरही कर्तृत्वक्षेत्रात ती राबवू शकतो. म्हणजेच एकमेकांचा जीव न घेताही माणसाला त्याचा पराक्रम दाखविता येतो. स्वतःचो रग जिरविता येते. उदा. जगात अद्यापी माणसाने न काबिज केलेली अनेक उंच पर्वतशिखरे त्याच्या जिद्दीची वाट पाहात आहेत. तसेच गावठी होडक्यातून कोणीतरी आपला तीर गाठील म्हणून वाट पाहाणारे सागरही जगात आहेत. उत्तर वा दक्षिण ध्रुवांचो टोके, अंतराळे, अद्यापही कितीतरी मोहिमा माणसाची नि त्याच्या जिद्दीची वाट पाहात आहेत. या मोहिमा एकेकट्या व्यक्तिसाठीच नव्हे तर राष्ट्रांच्या राष्ट्रानाही मोकळ्या आहेत. कोणीही ते पराक्रम करू शकतो. स्वतःची रग कसास लावू शकतो.

वैयक्तिक आणि सामुदायिक वा राष्ट्रीय ईर्षेला व आवेशाला वाव देऊ शकणारे अशा प्रकारचे राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय कार्यक्रम आणखिही दोन गोष्टी



अनुक्रमणिका

साध्य करतात. एकतर भिन्नभिन्न भाषा बोलणारी, भिन्नभिन्न राष्टीयत्व सांगणारी अनेक प्रकारची मंडळी या निमित्ताने एकत्र येतात. त्यांच्या ओळखी होतात. त्यांच्यात वैचारिक आणि भावनिक देवाणघेवाण होते. थोडक्यात वेगवेगळच्या संस्थानींच्या मंडळींची परस्परांशी मैत्री होते. दुसरी गोष्ट अशी की या प्रकारच्या आंतरराष्ट्रीय कार्यक्रमात भाग घेणारी मंडळी अनेकदा विरुद्ध राजकिय प्रणालीची असतील, किंवा जे अनेक प्रकारे भिन्न आहेत असेही ते लोक असतील. सांगायचा मुद्दा असा की वेगवेगळ्या लोकांचा संपर्क या निमित्ताने येत असल्याने एकमेकांच्या राष्ट्रांसंबंधी वगैरेचे अनेक प्रकारचे अकारण गैरसमज कमी होण्यास मदत होऊ शकेल. वेगवेगळी राजकीय मतप्रणाली धारण 'करणाऱ्या' राष्ट्रातील लोकांत परस्परांच्या सद्हेतूविषयी जो गैरसमज आढळतो, आणि परस्परांविषयीचा जो अविश्वास दिसून येतो तो जर या स्पर्धांमुळे कमी झाला तर तोही स्पर्धांचा उपयोग कमी महत्त्वाचा नाही.

माणूस आदिम अवस्थेत असतानाच त्याच्या ठिकाणी तयारी झालेली झुंजारवृत्ती स्वतःच्या स्वार्थी हेतूसाठी राबविण्याच्या कामात जनतापुढाऱ्यांचा क्रमांक फार वरचा लागेल. हे लोकनेते आणि तथाकथित जनतेचे राजे भाषणचातुर्याच्या जोरावर समाजातल्या वेगवेगळ्या वर्गाची मते परस्परांविरुद्ध कलुषित करतात. एकमेकांच्या सद्हेतूविषयी त्यांच्या मनात संशय निर्माण करतात. थोडक्या भाषणचातुर्याच्या बळावर एका जमातीला दुसऱ्या जमातीविषयी, एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राविषयी आकस धरावयास प्रवृत्त करतात. माणसाच्या मनातील स्फोटक व आक्रमक भावनाना चिथावणी देऊन लोकांची मने प्रक्षुब्ध करण्याचे लोकपुढाऱ्यांचे कसब आजच्या लोकशाही जमान्यात ठायी ठायी आपण अनुभवित आहोत. केवळ हुकूमशाही देशातच आक्रमक भावना चिथावण्याचा हा प्रकार होतो असे नव्हे. हुकूमशाही देशात एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध चिथावणी दिली जाते. किंवा हिटलरप्रमाणे देशातल्या देशातच पण वंशाने बहुजन समाजापेक्षा भिन्न असलेल्या जमातीविरुद्ध चिथावणी देण्यात येते. द्वेषाच्या भावनेने माणसे जितकी लवकर संघटित होतात तितकी ती प्रेमाच्या वा सहकार्याच्या भावनेने संघटित होत नाहीत. सर्वसामान्य माणूस हा अनेक बाबतीत अपरिपक्व असतो. अनेक प्रकारे अपयशी असतो. याच मानसिक वस्तुस्थितीचा फायदा घेऊन हे पुढारी त्याचा द्वेष आणि मत्सर चिथावतात. सर्वात दुर्दैवाची गोष्ट म्हणजे आपण काय करीत आहोत हे या सर्वांना चांगल्या प्रकारे कळत असते. परंतु पुढारी म्हणून झटपट यशस्वी होण्याचा दुसरा कोठलाच मार्ग त्याना अवगत नसल्याने त्यातल्या त्यात सोप्या असणाऱ्या या मार्गाची कास ते धरतात. दोन गटात वा जातीजमातीत वैमनस्य फैलावून जितक्या लवकर नेतेपण मिळवता येते तितक्या लोकर ते सरळ मार्गांनी मिळू शकत नाही. लोकांच्या सरळ आणि





काहीशा भोळसट स्वभावाचा गैरफायदा घेण्याइतकी ही मंडळी लवाड व तरबेज असतात. पुढारीपण मिळविण्यासाठी अथवा मिळालेले पुढारीपण टिकविण्यासाठी ते दोन धार्मिक वा सामाजिक वर्गात तट पाडतात. हिंसक भावना भडकावतात आणि शक्य तो दोन्ही गट एकमेकाचे कायम वैरी कसे राहतील याची काळजी घेतात. कारण असे करण्यावरच त्यांच्या पुढारीपणाचे टिकाऊपण अवलंबून असते. इतिहासात आजवर होऊन गेलेल्या विजयेच्छू आणि आक्रमक तत्वप्रणालिनी आणि धर्मसंस्थानी स्वतःच्या मताच्या प्रसारासाठी फक्त याच एका तंत्राचा वापर केल्याचे आढळते. आपल्यापेक्षा वेगळ्या राजकीय विचारसरणीची वा धर्माची माणसे ही खरोखर माणसेच नव्हत, ती निव्वळ पशू आहेत नि त्याना माणसात आणण्याचे काम परमेश्वराने वा नियतीने आपणावर सोपविले आहे; त्यांच्या जीवाचे आणि वित्ताचे आम्ही श्रेष्ठ माणसानी काहीही केले तरी ते क्षम्यच आहे अशा प्रकारचे विचार ही नेतेमंडळी आपल्या लोकांच्या डोक्यात सतत भरवतात. मानसशास्त्रदृष्ट्या विचार केल्यास असे दिसून येईल की मनाने एकमेकापासून संपूर्णपणे दूर गेल्यावाचून माणसे माणसांचा गळा घोटावयास तयार होत नाहीत. जोवर आपण इतरांच्या सुखदुःखाशी एकरूप असतो तोवर त्या इतरांचा कधीमधी राग येत राहिला तरी त्यांचे निर्मूलन करण्याचे विचार आपल्या मनात येणार नाहीत. अपरिचित माणसावर हात उगारताना आपल्या मनाची चलबिचल होत नाही ही तर नेहमीच्या पाहाण्यातली गोष्ट आहे. साधा आगगाडीचा प्रवास घ्या. गाडीत बसावयास जागा हवी म्हणून प्रसंगी बायकामुले व वृद्ध यानाही ढकलून बाजूला करताना आपण चांगली सुशिक्षित माणसे पाहतो. कधी कधी आपण आवेशात ढकलून ज्याची जागा घेतली तो व्यक्ती आपल्या ओळखितली निघते आणि आपल्या शरमेला पारावार उरत नाही. आपण शरमतो याचाच अर्थ आधीच जर तो चेहरा आपण ओळखला असता तर तसले लज्जास्पद वर्तन आपण केले नसते. याचाच अर्थ अपरिचितांशी आपण कशाही प्रकारचे निंद्य वर्तन करू धजतो. याच मानसशास्त्राचा उपयोग करून धार्मिक व तात्विकच नव्हे तर इतरही राजकीय व सर्व प्रकारचे डावपेचवाले आपले डावपेच चालवित असतात. आमचा धर्म परमेश्वराचा, तो सैतानाचा. आमचे राजकीय तत्वज्ञान खरे, ते खोटे. आम्ही धर्माच्या बाजूने लढत आहोत, ते अधर्माच्या, पापाच्या. ही जी नेत्यांची भाषा आहे तो माणसामाणसात फूट पाडणारी भाषा आहे. तिचा उद्देश शत्रूला तो माणूसच नाही असे ठरविण्याचा असतो. शत्रू हा तुम्हाआम्हा-सारखा माणूस नाही हे एकदा तुमच्याआमच्या मनावर बिंबले की मग समोरच्या शत्रूचा फडशा पाडावयास आमची काहीच हरकत नसते.

आता आपण फक्त एका विशिष्ट प्रकारच्या नेतृत्वाचा विचार केला. ज्यांचा विश्वास फक्त हिंसेवर असतो असे हे नेतृत्व असते. नेतृत्व आणखिही

अनेक प्रकारचे आहे. काहीजण फक्त शब्दवीर असतात. त्यांचे काम मोहक' आक्रमक, नेत्रदिपक घोषणांनी व लंब्याचवड्या आश्वासनांनी लोकांची मने स्वतःकडे आकर्षून घ्यायची व त्यांना कोठल्यातरी कार्यक्रमाला जुंपायचे. थोडक्यात या प्रकारचे वाचिवीर जनतेला चळवळी साठी तयार करतात. चळवळीसाठी योग्य ती मानसिक भूमी निर्माण करतात, तर आणखी काहीजण अत्यंत माथेफिरू प्रकारचे पुढारी असतात. या प्रकारच्या पुढाऱ्यांना प्रत्यक्ष ॲक्शनमध्ये रस असतो. बौद्धिक तत्वज्ञान नको, कार्यक्रम द्या अशीच त्यांची मागणी असते. तर तिसऱ्या जातीचे पुढारी हे विचार व कृती ही दोन्ही करू शकणारे असतात. विशेषतः एखादी चळवळ मार्गस्थ झाली की तिची सूत्रे हाती घेऊन तिला अंतिम टप्प्यावर नेण्याच्या कामी हे लोक फार तरबेज असतात. चळवळ योग्य त्या मार्गाने जात आहे किंवा नाही, तिची उद्दीष्टे कितपत साध्य होत आहेत इत्यादी गोष्टींवर लक्ष ठेवण्याचे काम फक्त याच लोकांकडून होऊ शकते. कारण त्यांचे कौशल्यच व्यावहारिक प्रकारचे असते. असो. आता समाजात नव्या चळवळी सुरू होतात तेव्हा एकूण काय घडते त्याचे चित्र पाहू.

कोठल्याही स्थिर समाज हा काही सुस्थिर सामाजिक-राजकीय संस्थांच्या आधाराने उभा असतो. या संस्था तेथल्या बहुसंख्य लोकांनी स्वतःच्या मनाने स्वीकारलेल्या असतात. कोणाकोणाच्या मनात त्यांच्याविषयी काही आकस असला तरी तो फारसा तीव्र नसल्याने त्यांच्याविरुद्ध बंड करून त्या मोडून टाकाव्यात अशा प्रकारचे लोकमत तेथे नसते. उलट या संस्थांचा तळचा आधार हा नाना प्रकारच्या बौद्धिक कल्पना व मिथ्सचा असतो. या बौद्धिक कल्पनांना व मिथ्सना लोकमताचा पाठिंबा असल्याने किंवा त्या म्हणजेच तेथले सर्वसाधारण लोकमत असल्याने या संस्था आपले वर्चस्व टिकवून असतात असेही आपण म्हणू शकतो. या मिथ्स् सामाजिक स्वरूपाच्या असतील. राजकिय स्वरूपाच्या असतील वा धार्मिक, आध्यात्मिक किंवा संमिश्र स्वरूपाच्याही असतील. पण जोवर या मिथ्स् प्रबळ असतात तोवर तो समाज एका संथ गतीने चालू राहातो. म्हणून तेथे जर काही नवे घडवून आणायचे असले, मूलभूत परिवर्तन साध्य करायचे असेल तर त्यासाठी प्रथम तेथल्या या मिथ्स् खिळखिळ्या कराव्या लागतात. कारण या प्रकारच्या मिथ्स वा बौद्धिक कल्पिते जशी नव्या सामाजिक वगैरे व्यवस्थेला मदतनीसायक बनतात तशाच प्रकारे दीर्घ कालावधिनंतर तीच अवजड निरुपयोगीसुद्धा बनू शकतात. चातुर्वर्ण्य परमेश्वराने निर्माण केला आहे, त्यात माणसांनी ढवळाढवळ करू नये हा मिथ् एकेकाळी निरनिराळ्या धंद्यातल्या कसबी माणसांना इतर जातींच्या अकारण आक्रमकपणापासून संरक्षण देण्यास उपयोगी पडला. पण पुढे तोच समाजपुरुषाच्या गळ्यातल्या लोढण्या-सारखा झाला. समाजाने मनातून तिला काढून टाकले. कारण प्रथम लोकांच्या





संरक्षणाच्या मानसिक गरजेतून समाजपुरुपाने ही मिथ् निर्माण केली खरी पण पुढे विशेषीकरणाच्या ( स्पेशलायझेशनच्या ) तत्वानुसार पहिल्या व्यापारीसंबंधांचें रूपांतर कडक जाती नि पोटजातीत होऊन समाजाच्या चलनवळणाला खीळ बसली. चातुर्वर्ण्याच्या मिथप्रमाणे राजा हा विष्णूचा अवतार आहे हीही मिथ् आरंभी समाजाला स्थैर्य द्यावयास उपयोगी पडत होती. पण पुढे समाज अधिक प्रगत झाल्यावर तीच समाजाचे नुकसान करणारी ठरू लागली. किंवा श्रीमंत आणि गरीब हे भेद परमेश्वराने निर्माण केले आहेत. त्यात ढवळाढवळ करू पाहाणे म्हणजे परमेश्वराच्या कार्यातच ढवळढवळ करण्यासारखी आहे. ही पाश्चात्यांकडची मिथ् प्ररंभी गरीब–श्रीमंतमाधला तणाव कमी राखावयास उपयोगी पडली. कारण आधीच्या काळातले गरीब हे औद्योगिक क्रांतीनंतर येणाऱ्या समाजातल्या गरिबांसारखे नसतात, पहिल्या समाजात अनेक लोक गरीब असले तरी ते भुकेकंगाल आणि श्रीमंतांकडून पिळणूक व लुबाडणूक झालेले गरिब नसत. तेव्हा ही मिथ् त्या काळी तेवढी काचत नसे. गरिबानाही ती कबूल होती. औद्योगिक क्रांतीनंतर गरिबीची व्याख्याच बदलली.

तर सांगायची गोष्ट अशी की समाजाच्या सुरळित चालण्याला साहाय्य देणाऱ्या या अशा बऱ्याचशा मिथ्स् बौद्धिक पायावर आधारलेल्या नसतात. तर भावनिक. अबौद्धिक पायावर आधारलेल्या असतात. समाजाला आतूनच तसे काही वाटल्याने त्या तेथे तयार झालेल्या असतात. फक्त कोणा विशेष बुद्धीच्या व कल्पनाशक्तीच्या इसमाने असेच केव्हातरी त्याना बौद्धिक शब्दरूप दिलेले असते. पण हे शब्दरूप दिले जाण्यापूर्वी अस्पष्ट स्वरूपात का होईना पण तेथल्या लोकांच्या एकूण भावना व अगदी आतले विचार त्या मिथ्मध्ये सांगितलेल्या दिशेनेच चालू असतात. आणि त्यांची प्रच्छन्न दिशा ती असते म्हणूनच लोकाना त्या मिथ्स मानवतात. असो. या मिथ्सना शब्दरूप जसे त्या त्या समाजातले शब्दपंडित ( men of words ) देत असतात तशाच प्रकारे त्यांचा भ्रामकपणा उघड करून त्यांचे खच्चीकरण करण्याचे कामही हेच शब्दबाज बुद्धीमंत करतात. ही एक दुहेरी प्रक्रिया आहे. कारण एकीकडे हे शब्दप्रभू चालू मिथ्स्चे वस्त्रहरण करतात, त्यांचा खोटेपणा, त्यातल्या आत्मविसंगती उघड करून त्यांचा फोलपणा व धोका सामान्य माणसाच्या निदर्शनास आणतात. त्याला त्या धोक्यापासून सावध करतात. तर दुसरीकडे त्याच वेळी नव्या मिथ्चा पायाही तेच घालित असतात. माणूस हा कार्यप्रवण प्राणी खरा. पण तो सहजासहजी कार्यप्रवण होत नाही. त्याला आशेची भुलावण दाखवावी लागते. तरच तो उत्साहाने एखाद्या कार्यात भाग घेतो. एखाद्या राजकिय व सामाजिक बाबीबद्दल त्याचा संपूर्ण भ्रमनिरास झाला एवढ्याच केवळ कारणापायी तो सामाजिक किंवा राजकिय क्रांतीला प्रवृत्त होणार नाही. त्यासाठी भावी सौख्याची नवी मिथ् त्याच्या नजरे-





समोर झुलत ठेवावी लागेल. थोडक्यात जुन्या कल्पितांची जागा घेऊ शकतील अशी तोडीस तोड नवी कल्पिते देता आली तरच लोक उत्साहाने चळवळीस तयार होतात. राजेशाही नष्ट करा. म्हणजे स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुत्व यांचे नवे राज्य अस्तित्वात येईल अशी हाकाटी केल्यावाचून लोक राजेशाही-विरुद्ध बंड करीत नाहीत. हीच कथा थोड्याफार फरकाने इतरही बौद्धिक कल्पितांची. गुलाबी स्वप्नांच्या भुलावणीखेरीज जनतेच्या अंगात उत्साहाचे वारे संचारत नाही. गुलाबी हा शब्द जाणूनबुजून वापरलेला आहे. कारण यातील एकही विचारसरणी शंभर टक्के बुद्धीवादावर आधारलेली नसते. त्यात भावविवशतेचाच भाग अधिक असतो. उदा. समतेचे राज्य हे शब्द ऐकावयास ठीक असले तरी प्रत्यक्षात आणता येण्यास तितकेच अशक्य आहेत. समतेचा सर्वसाधारण निकष गवसण्यासारखा नाही. राज्यसंस्थेच्या कायद्यासमोर सर्व माणसे समान असावीत एवढेच फक्त आपण खात्रीपूर्वक प्रत्यक्षात आणू शकतो. बाकी इतर कोठल्याच बाबतीत सर्वांना सारखी वागणूक देणे आपणास शक्य नसते. जन्मतः माणसे अगणित प्रकारे असमान म्हणूनच जन्मास येतात. तेव्हा त्या सगळ्यांची खरी लायकी शोधून काढून त्याना समान संधी वा वागणूक देणे हे व्यवहारतः अशक्य असते. असो. तर समाजातले हे बुद्धिमान भाषाप्रभू नव्या मिथ्स् उभ्या करतात. जुन्या खिळखिळ्या किंवा नष्ट करतात. जनतेला स्वतः-विषयी नि स्वतःच्या भवितव्याविषयी नवा आत्मविश्वास, नवा Faith, नवी श्रद्धा देतात. व तसे करून नव्या आशेसाठी जुन्या स्वास्थ्याची ओढ टाकून द्यावयास त्याना प्रवृत्त करतात. त्याच प्रकारे सतत जुन्या संस्था आणि मिथ्स्वर सतत टीकेचा मारा करून प्रस्थापित राज्यकर्त्या व इतर प्रकारच्या धुरिणवर्गाचा स्वतःवरचा नि स्वतःच्या विचारसरणींवरचा विश्वासही खच्ची करतात. आणि पर्यायाने नव्या जीवनासाठी होऊ घातलेल्या चळवळीना त्यांच्या-कडून जो विरोध होणार असतो त्याची धारही ते बोथट बनवितात. विद्यमान सामाजिक, राजकिय वा इतर संस्थांवरचा लोकांचा विश्वास उडाला व नवीन आनंददायक स्वप्नांच्या प्रेमात लोक गवसले की समाजक्षितिजावर दुसऱ्या प्रकारचा पुढारी अवतीर्ण होतो. भाषाप्रभूंनी नव्या समाजासाठी बौद्धिक भूमी तयार केलेली असते. आता प्रत्यक्ष चळवळ्यांवाचून गाडी पुढे रेटली जाणार नसते. हे चळवळे आक्रमक व हिंसक चळवळी उभारतात. कारण हिंसा आणि आक्रमणाच्या ओढीने माणसे जितकी लवकर उत्तेजित व संघटित होतात तितकी ती सौम्य आणि रचनात्मक कार्याच्या ओढीने होत नाहीत. अर्थात हिंसक चळवळींतील बहुतेक आघाडीचे वीर हे हिंसेच्या ओढीनेच तेथे आलेले असतात. रचनात्मक कार्याच्या ओढीने नव्हे. पण चळवळींना जोर यांच्याच अस्तित्वाने येतो. कारण हेच माणसामाणसांच्या आक्रमक भावनांना स्वतःच्या उदाहरणाने दिशा दाखवू शकतात.

या हिंसावाद्यांची एकमेव भूक विध्वंस, मोडतोड हीच असते. पुढे येणाऱ्या आदर्श राजवटीपेक्षा आजची प्रस्थापित राजवट मोडून टाकायची आहे याच कल्पनेने ते जास्तीतजास्त उत्तेजित झालेले असतात. मोडतोड मंडळींनी चळवळीला जोर आणला की मग ज्याला काही ना काही रचनात्मक व्हिजन आहे आणि जो व्यवहारदृष्ट्या चतुर आहे असा कृतीवीर पुढे सरसावतो. एकदा का या कृतीवीरांनी चळवळीची सूत्रे आपल्या हाती घेतली की मग त्या चळवळीला स्वतःला हवी ती दिशा ते देऊ पाहतात. आणि नवी राजवट अस्तित्वात आलीच तर तिचे स्वामी बनतात. मानवी समाजात अशा प्रकारे तीन प्रकारचे नेतेलोक पाहावयास मिळतात. काही प्रचलित प्रतिके, संकेतचिन्हे आणि बौद्धिक निष्ठा वगैरे हाताळणारे असतात. काही त्या समाजातली सुप्त हिंसात्मकता आणि आक्रमकता राबविणारे असतात तर काही योजनापूर्वक प्रकारे चळवळ चालवून ती शेवटास नेणारे आणि नवी सामाजिक व्यवस्था प्रस्थापित करणारे असतात. शब्दप्रभू, हिंसावादी माथेफिरू आणि कृतीशील संघटक ( ऑर्गनायझर्स ) असे त्यांचे तीन वर्ग करता येतील.

वर ज्या पुढाऱ्याबद्दल आपण लिहिले आहे त्याच्यामध्ये आलटून पालटून हे तिन्ही गुणधर्म आढळतात. तो शब्दप्रभू असतो. काहीसा कडवा माथेफिरू असतो. आणि काही थोड्या प्रमाणात कुशल संघटकही असतो. कोठलाही मानवी समाज घेतला तरी त्यातील बहुसंख्य माणसे, अनेक कारणांनी स्वतःवर असंतुष्ट असतात. स्वतःच्या नशिबाला बोल लावणारी व चडफडणारी असतात. याच चडफडण्याचा गैरफायदा घेऊन हे पुढारी जनतेतील एका वर्गाला दुसऱ्या वर्गाविरुद्ध उठवितात. माणसाचा दुसरा विशेष असा की जे सामाजिक वा धार्मिक गट त्याच्या परिचयाचे नसतात ते त्याला स्वतःचे संभाव्य शत्रू वाटतात. माणूस स्वतःच्या सद्हेतूंवर जेवढा विश्वास ठेवू शकतो तितका इतरांच्या सद्हेतूंवर ठेवू शकत नाही. हा त्याचा नैसर्गिक स्वभाव आहे. म्हणून अपरिचित ते त्याला भीतीदायक वाटतात. भीतीदायक म्हणून द्वेष्य वाटतात. याच भीती आणि संशयाच्या समूहमानसशास्त्राचा फायदा घेऊन एकाच समाजातील भिन्नभिन्न गटांना एकमेकांविरुद्ध फितविले जाते. हिंदू, मुसलमान किंवा इतर धर्मियांबद्दल; मुसलमान हिंदूधर्मियांबद्दल जे सरसकट अनुदार उद्गार काढू शकतात त्याचे मूळ यात आहे. मात्र असे असले तरी त्याच धर्मियांपैकी जी मंडळी आपल्या परिचयाची असतात ती दुष्टपणाच्या या सरसकट नियमाला अपवाद होत असे आपण मानतो हेही ध्यानात घेण्यासारखे आहे.

आपल्या परिचयाची माणसे आपण सरसकट दुष्ट आणि वाईट मानू शकत नाही कारण त्यांचा आपला परिचय असल्याने आपल्या मनातील नकारात्मक भावनांचा अध्यारोप आपणाला त्यांच्यावर करता येत नाही ही गोष्ट एकदा ध्यानात



अनुक्रमणिका

आली की जातीजातीतील अथवा धर्माधर्मातील अकारण वैमनस्य कमी करण्याचा एक मार्ग आपल्यापुढे उघड होतो. सर्वसामान्य माणसाला एकमेकाचा सक्रिय द्वेष करीत बसायला फुरसत नसते. हा द्वेष त्याच्या मनात त्याच्या गटाची पुढारी मंडळी भरविनात हे माहित झाले की या पुढारीमंडळींचा बंदोबस्त केला गेला तर सामाजिक द्वेषाचा एक उगम रोखला जाईल. हे साधे गणित आहे. तसेच जितक्या सहजतेने आपण अपरिचितांचा, परस्थांचा द्वेष करतो तितका तो स्वकियांचा नि परिचितांचा करू शकत नसल्याने या नेतेमंडळींना जर विरुद्ध बाजूच्या गटातून हिंडवून, फिरवून आणले तर आधी जितक्या सहजतेने त्यानी त्या गटाविरुद्ध प्रचार केला असता तितक्या सहजतेने नंतर ते तो करू शकणार नाहीत हे उघडच आहे. तथापि ज्यांच्या आदरातिथ्यासाठी या मंडळीना पाठवायचे ती मंडळी दुसऱ्या जमातीच्या पुढारीवर्गातली नसावीत. कारण दोघेहीजण एकाच प्रकारचे म्हणजे भोळ्याभाबड्यांची फसवणूक करण्याचे राजकारणच खेळत असल्याने ते जर त्यांच्याच धंद्यातल्या मंडळींकडे राहिले तर परस्परांच्या सद्हेतूंविषयी कधीच त्यांची खात्री पटणार नाही. कारण ते असे मानतील हे आदरातिथ्य हा राजकारणाच्या परिचित खेळाचाच भाग आहे. अशा परिस्थितीत एकमेकांच्या घरी जरी ही मंडळी सहासहा महिने राहिली तरी त्यांचे हृदयपरिवर्तन घडून येणार नाही. म्हणून या मंडळींची सोय सर्वसामान्य कुटुंबात केली जावी. म्हणजे मग ज्यांचा आस्थापूर्ण पाहुणचार आपण घेतला त्यांच्याविषयी कलुषित मत कसे व्यक्त करावे याचा त्याना विचार पडेल नि स्वतःच्या राजकीय स्वार्थासाठी तसे करावेसे वाटले तरी एकदम ते तसे करू धजणार नाहीत.

एकमेकांचा परिचय झाला की परस्परांविषयीच्या आक्रमक भावना सौम्य बनतात. म्हणून दोन भिन्न राजकिय तत्वज्ञाने धारण करणाऱ्या देशात वा त्यांच्या पक्षपात्यात जर खरी मैत्री प्रस्थापित होऊ शकली तर आज जगात जो अकारण मानसिक ताण दिसत आहे तो बऱ्याच मोठ्या प्रमाणात कमी होऊ शकेल. एखाद्या राष्ट्रात आपल्या चांगल्या परिचयाची जर बरीच माणसे राहात असली तर ते राष्ट्र राजकिय विचारदृष्ट्या जरी आपल्या राष्ट्रापेक्षा भिन्न असले तरी तेवढ्या कारणासाठी त्याचा द्वेष आपणाकडून करवला जाणार नाही. समजा, मला अभिप्रेत आहे तेवढी दाट मैत्री तेथल्या लोकांबद्दल आपल्या मनात निर्माण होऊ शकली नाही तरी कोणाही उपटसुंभ जनतापुढाऱ्याने त्या राष्ट्रातील माणसांबद्दल बिनबुडाचे उद्गार काढले म्हणून त्या उद्गारावर आज जसा आपण सहज विश्वास ठेवू शकतो तसा त्या वेळी ठेवणार नाही.

मनुष्याच्या ठिकाणी चिडाऊ आवेश आहे. त्याच्या पवित्र प्रतिकचिन्हांना वा मानमरातबाच्या कल्पनांना धक्का लागण्याचा खरा वा खोटा प्रसंग निर्माण होताच हा आवेश भडकून उठतो व माणूस प्रतिकारसज्ज बनतो. आवेशाची ही

भावना आता उपजत प्रवृत्तीवजा बनली आहे. म्हणजे तिचे कार्य क्रियाप्रतिक्रियात्मक पद्धतीने घडत असते. या गोष्टी तर वरच आपण पाहिल्या. पण यात जो महत्वाचा भाग आहे तो असा की मानचिन्हांना प्रत्यक्ष धोका दिसताच माणूस संतापाने जसा पेटून उठतो तशाच प्रकारे धोका नसताना धोक्याचा केवळ बहाणा केला असताही तो तसाच पेटून उठतो. म्हणजेच प्रतिकांच्या बाजूने वा विरुद्ध हा आवेश वापरला जाऊ शकतो. याचा साधा अर्थ हा आहे की आज काही लफंगे लोकनेते या भावनेचा गैरवापर करून माणसामाणसात कलागती निर्माण करण्यासाठी तिचा वापर करू शकतात. उद्या तिचाच वापर अखिल मानवजातीला कल्याणकारक ठरू शकतील अशाही कार्याकडे होऊ शकेल. येथे अर्थात दोन वेगवेगळ्या बाजूनी या भावनेवर आघात करावे लागतील. एका बाजूने संकुचित उद्दिष्टांकडचा तिचा ओढा आपणास कमी करावा लागेल तर दुसरीकडे व्यापक हितसंबंधांकडे तिचा ओघ वळवावा लागेल.

ज्या ज्या गोष्टींना आपण आपली जीवनमूल्ये समजतो त्यांच्या त्यांच्या रक्षणासाठी आपण प्राणपणाने लढू इच्छितो. म्हणजेच ही मूल्ये आपल्या आत्यंतिक अभिमानाच्या वस्तू बनतात. इतक्या की त्याना धक्का म्हणजे स्वतःच्या अस्मितेलाच तो धक्का आहे अशी कल्पना आम्ही करून घेतो. येथे एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. ती ही की आपल्या एकूण मूल्यांपैकी फारच थोडी मूल्ये खऱ्या अर्थाने जीवनमरणाच्या प्रश्नाइतकी महत्वाची असतात. आपली बहुतेक मूल्ये तशा दृष्टीने विचार करता तितपतच महत्वाची असतात. आपली मूल्ये हे काही संकेत आहेत नि संकेत म्हणून आमच्या रक्तात ते भिनले आहेत. जसे आमचे काही विशिष्ट संकेत आहेत तशाच प्रकारे इतर संस्कृतींचेही संकेत आहेत. म्हणजेच आम्ही आमच्या संकेताना जीवनमरणाचा प्रश्न मानतो कारण आमच्या वाडवडिलानी त्याना तसे मानले होते. या संकेताना किंवा मूल्याना स्वाभाविक किंवा प्राकृतिक महत्व नाही. ते त्यांच्यात्यांच्यासाठी महत्वाचे नाहीत. त्याना जे महत्व किंवा जो मान आहे तो त्यांच्या बरोबरच्या आमच्या वैयक्तिक संबंधासाठी आहे. बालपणी वाडवडिलांच्या अनुकरणातून, मित्रांशी खेळताना काही कृतींना व बाबींना आम्ही मूल्य मानले व ती आमची मूल्ये झाली. प्रत्येक संस्कृतीगणिक यातील बरीच मूल्ये बनतात. मूल्ये आपण स्वतःच्या नकळत आत्मसात करतो. सारासार विचार करून किंवा त्यांच्या युक्तायुक्ततेची चौकशी करून नव्हे. मारमूर नावाच्या एका गृहस्थानी अगदी अलिकडेच एक नवा सिद्धांत मांडला आहे. ते म्हणतात की मूल्य ही आमच्या आस्मीतेची बाब असते. आता ज्याच्याज्याच्याविषयी अशा प्रकारचा अभिमान आम्ही बाळगतो त्या सर्वांना जर आम्ही आमची मूल्ये मानू लागलो तर युद्धखोरी हे देखिल एक थोर मानवी मूल्य बनेल. कारण प्रत्येक राष्ट्राला त्या राष्ट्राने जिंकलेले युद्ध ही एक अभिमानाची बाब वाटत असते. एवढेच नव्हे तर

आपण केली ती युद्धे न्याय आणि तत्वासाठी होती असेही जगातील यच्चयावत सर्व लोकाना वाटत असते; कोठल्याही राष्ट्राच्या आत्मगौरवात स्वत:विषयीचा अभिमान आणि गैरवाजवी गुणगौरव या दोहोंचे नेहमीपेक्षा थोडे जादा प्रमाण नेहमीच आढळते. अशा परिस्थितीत युद्धाची विफलता माणसाला कशी पटावी? युद्धाची विफलता न पटण्याचे आणखी एक कारण असे की आपल्या दृष्टीने पराक्रम फक्त युद्धक्षेत्रावरच काय तो व्यक्त होऊ शकतो? युद्ध क्षेत्राबाहेर पराक्रम नावाची चीज दृष्टोत्पत्तीस येऊ शकत नाही. जणू काही मानवी शौर्य, धैर्य, प्रसंगावधान, सहकाऱ्यांसंबंधीचे प्रेम आणि निष्ठा याना युद्धक्षेत्राबाहेर वाव असूच शकत नाही. युद्धात जी क्रूरता दाखविता येते तोच काय तो मर्दानीपणा. युद्ध नको म्हणणारे लोक भेकड असतात. शांततावादाचे प्रयत्न हे वायर्कीपणाचे लक्षण असते. युद्ध नको, शांतता हवी असे म्हणणारे लोक देशाचा अवमानघात करू पाहातात, ते राष्ट्रद्रोही आहेत. या प्रकारचा प्रचार लोकांच्या कानीकपाळी ओरडण्यात येतो. युद्धातील प्राणहानी राष्ट्रे बिरुदासारखी वागवितात, वीरांच्या खऱ्याखोट्या युद्धकथा सांगून पराक्रम म्हणजे शत्रूच्या जास्तीतजास्त लोकांची कत्तल असे मुलांच्या मनावर त्यांच्या लहानपणापासून बिंबविण्यात येते. शौर्यधैर्यपराक्रमाविषयीच्या अत्यंत एकांगी आणि अतिरंजित कल्पना मुलांच्या डोक्यात भरविण्यात येतात. या प्रकारच्या कथांचा दुहेरी विपरित परिणाम घडून येतो. या कथा वाचल्याने युद्धाची भयानकता वाजवीपेक्षा कमी केली जाते, तशाच प्रकारे युद्ध म्हणजे पराक्रमाला वाव अशी एक खोटी कल्पना डोक्यात घर करून बसते. युद्धविषयक अतिरंजित कल्पनांमुळे युद्ध हेही लहानथोरास एक जादा मूल्य वाटू लागते. मग शेरमनसारखा एखादा लष्करी सेनाग्रणी जेव्हा म्हणतो की " युद्ध हा शुद्ध नरक आहे. युद्धातून पैदा होणारा गौरव ही खरी वस्तू नाही. तो वास्तवाचा एक नकली आभास आहे." तेव्हा युद्धाचे खरे स्वरूप उघड करून पाहाणारे त्याचे उद्गार दडपून टाकण्याचा प्रयत्न झाला. न जाणो लोकमतापर्यंत त्याचे उद्गार पोचले तर युद्धाची विफलता त्याना पटेल ! ज्यानी युद्धाच्या भयानकतेचा चक्षुर्वैसत्यम् अनुभव घेतला आहे अशा शेरमनसारख्यांच्या अनुभविक उद्गारांचा युद्धविरोधी लोकमत तयार होण्याच्या दृष्टीने बराच उपयोग होण्यासारखा असतो. पण राष्ट्रांचे धुरीण व राज्यकर्ते कधी वैयक्तिक स्वार्थासाठी तर कधी इतर अवांतर कारणांसाठी या प्रकारच्या युद्धविरोधी कैफियती दडपून टाकतात.

माणसाच्या ठिकाणचा कलहाचा आवेश अनेक बाबतीत त्याला उपकारक ठरला आहे. हा आवेश गेल्या हजारो वर्षांच्या उत्क्रांतीप्रक्रियेत त्याच्या ठिकाणी मर्मीभूत होत आला आहे. कदाचित फार फार प्राचीन काळी माणसे जेव्हा टोळ्याटोळ्यांच्या टोळ्यांतून राहात होती व त्यांच्या सतत परस्परांशी चकमकी

चालू होत्या तेव्हा हा गुणधर्म त्यांच्यात आला असावा. कडवा आवेश ही एक सामुदायिक प्रतिकारभावना आहे. आणि ती खऱ्या वा काल्पनिक शत्रुविरुद्ध कार्य करते. हजारो वर्षांच्या अनुभवाने माणसाच्या ठिकाणी ती आता दृढ झाली आहे. पहिल्यापहिल्याने माणूस त्याच्या प्रत्यक्ष जातभाईसाठी आवेशपूर्ण लढाई करीत असे. पुढे पुढे तो त्याच्या कळपाच्या मानचिन्हांसाठीही तितक्याच आवेशाने लढू लागला. हा लढाऊ आवेश ही एक सामुदायिक भावना असल्याने तिच्यामुळे संपूर्ण समाज सुसंघटित होत असतो. म्हणून एका दृष्टीने विचार करता लढाऊ आवेश मानवजातीच्या जातीरक्षणासाठी उपकारक आहे. परंतु दुसऱ्या दृष्टीने पाहाता अखिल मानवजातीच्या एकत्रित हितासाठी तो अपकारकही आहे. कारण माणसांच्या समुदायात त्याच्यामुळे फूट पडते. माणसाला स्वतःच्या गटाबद्दल प्रेम वाटते. आणि त्याच वेळी इतर भिन्न गटांबद्दल भीती आणि रागही वाटतो. स्वतःच्या जातीच्या अंधाभिमानापायी इतर जातीजमातींचा द्वेष नि मत्सर करण्याची जी स्वाभाविक प्रवृत्ती माणसाच्या जातीत आढळते ती अत्यंत धोकेबाज आहे. माणसे स्वतःच्या चिरेबंदी संघटनेवर भक्ती करतील. पण इतरांच्या तशाच प्रकारच्या संघटनेचा तीव्र द्वेष करतील. याला अर्थात एकदोन स्वाभाविक कारणे आहेत. प्रेम आणि द्वेष या दोन भावना सदोजित एकत्रित राहातात. जेथे प्रकट प्रेम आहे तेथे प्रच्छन्न द्वेषही आहे. स्वतःच्या गटाच्या बाबतीत यापैकी फक्त एकाच विकाराला मुक्तवाट मिळू शकते. राहाता राहिली प्रेमाची उलटी बाजू द्वेष. हा द्वेष जर शरिरावस्थेतून काढून टाकला गेला नाही तर त्या शरिरालाच तो पिडू लागेल. म्हणून हा द्वेष बाहेर पडून जावाच लागतो. माणसे स्वतःच्या गटाशी मनाने तद्रूप बनतात आणि तद्रूप बनल्याने गटाला किंवा गटाच्या मानाला धक्का तो त्याना स्वतःला बसू पाहाणाऱ्या धक्क्यागत वाटतो. माणूस स्वतःच्या गटाशी इतका बाजवीपेक्षा अधिक एकरूप झाला नसता तर इतर गटांची आज त्याला भेडसावते ती अकारण भीतीही त्याला भेडसावती ना.

मानवी मनाच्या ठिकाणी आढळणाऱ्या या झुंजार आवेशाचे तीन खास विशेष आहेत. एक, माणसाच्या द्वेषभावनेला आवाहन केल्याने हा आवेश जितक्या लवकर जागा होईल तितका तो प्रेमाच्या आवाहनासाठी होणार नाही. हिंसक कामासाठी तो जितका लवकर तयार होईल तितक्या लवकर तो रचनात्मक कार्यासाठी होणार नाही. दोन, प्रत्यक्ष आणि मूर्त उद्दिष्टांसाठी तो जितका लवकर चेतविता येतो तितका अप्रत्यक्ष व अमूर्त उद्दिष्टांसाठी चेतविता येत नाही. समोरच्या शत्रूचा निःपात करताना तो जितक्या लवकर जागा होईल तितक्या लवकर लोकहिताच्या दशवार्षिक कार्यक्रमासाठी होणार नाही. कारण मूर्त ध्येयाशी मनाने लगेच एकरूप होता येते तितके अमूर्ताशी होता येत नाही. तीन, या आवेशाला तरुण मने जितकी लवकर वश होतात तितकी लवकर



अनुक्रमणिका

म्हणारी मने होत नाहीत. याच कारणासाठी कोठल्याही लढाऊ आक्रमक कार्यक्रमासाठी – मग तो कार्यक्रम ध्येयवादी असो वा भंपकपणाचा असो, त्याला तात्त्विक पाया असो वा नसो – तरुण वर्ग विचार न करता हिरिरीने बाहेर पडतो.

मित्रत्वाच्या, प्रेमाच्या, अहिंसेच्या ओढीपेक्षा शत्रुत्वाच्या, द्वेषाच्या आणि हिंसेच्या ओढीने माणसे लवकर उत्तेजित होतात. याचा विचार करता जगात दोन महत्त्वाच्या राजकीय वस्तुस्थिती आपल्या नजरेस पडतात. ढोबळ अर्थाने पाहिल्यास जगात आज दोन ठळक राजकीय मतप्रणाल्या आणि त्यावर आधारित शासने कारभार करताना दिसतात. यातील एक शासन लोकशाही पद्धतीचे आहे तर दुसरे हुकूमशाही पद्धतीचे आहे. नैसर्गिक झुंजार आवेश हाताळताना शासनाला स्वतःच्या विशिष्ट स्वरूपाचा फायदा मिळू शकतो. चीन किंवा रशिया येथे हुकूमशाही राजवटी आहेत. हुकूमशाही राजवटी बुद्धिपुरस्पर ठरवून आपल्या शत्रूची निवड करू शकतात. म्हणजेच लोकाना हा आपला शत्रू, आपल्या देशाचे याच्यापासून रक्षण करायचे आहे या प्रकारच्या बौद्धिक सूचना देऊन कोणाहीविरुद्ध त्यांचे मन फितवू शकतात व तसे करून त्यांच्या सुप्त आक्रमकपणासाठी आधीपासूनच तयार विषय देऊ शकतात. हुकूमशाहीत शत्रू–मित्र याबद्दल लोकांची ठाम भूमिका असू शकते आणि अशी ठाम भूमिका असल्याने भावनिक ऊर्जा कशा प्रकारे वळवावी याचाही ठाम साचा असू शकतो. लोकशाहीना या प्रकारची एकांगी भूमिका स्वीकारता येत नाही. कारण लोकशाहीत अनेक प्रकारच्या वैचारिक भूमिकाना वाव असू शकतो. तेथे हा तुमचा शत्रू, याच्यावर लक्ष ठेवा असे सांगून उपजत झुंजारवृत्तीला अपेक्षित वळण देता येत नाही. सारांश, हुकूमशाहीत खऱ्या वा काल्पनिक शत्रूचा बागुलबोवा निर्माण करून लोकांच्या लढाऊ शक्ती गुंतवून ठेवता येतात. तशाच प्रकारे त्याना मोठ्या प्रमाणावर संघटितही करता येते. लोकशाहीत तशा प्रकारचा फायदा सरकारला घेता येत नाही, लोकशाहीत तरुणांचे तांडे आणि त्यांची जिद्द व आक्रमकपणा गुंतवून ठेवण्याचे काम निरनिराळ्या पक्षांचे नेते करतात. किंवा इतर अशाच प्रकारच्या खाजगी संघटना करतात. आणि याचे काही फायदे आहेत आणि तोटेही आहेत. मुख्य फायदा हा की तरुणांची मने कशात ना कशात या संघटना गुंतवून ठेवतात. एक गोष्ट एव्हाना आपण मान्य केली आहे. ती ही की जेथे माणूस आहे तेथे हा आवेश आहेच. असा आवेश हा माणसाच्या स्वभावाचा स्थायीभाव आहे. दुसरी गोष्ट अशी की माणसाच्या जैविक रचनेत आक्रमकपणाचा कायम अंश आहे. जगातला कोठलाही आणि कोठल्याही काळातला समाज घेतला तरी त्यातील व्यक्ती किंवा व्यक्तित्वाच्या असतात असे आपल्या ध्यानात येईल. माणसाला समाज हवा असतो आणि समाज नकोही असतो. समाज म्हणजे सुव्यवस्था, बेबंदशाहीपासून बलवानांच्या अन्याय–अत्याचारापासून संरक्षण म्हणून समाज



अनुक्रमणिका



एकीकडे माणसाला हवा असतो. पण दुसरीकडे हाच समाज हे आपल्या स्वैर वृत्तीवरचे, स्वच्छंदीपणाच्या आवडीवरचे बंधन असल्याने तो नकोसाही वाटतो. समाज हा एकीकडे सुरक्षितपणाची हमी असते. तो आपले पालनपोषण करतो. आपणाला धारण करतो. पण दुसरीकडे आपला कोंडमारा करतो. आपणाला आवर घालतो. खच्ची करतो. समाजाच्या बाबतीत आपली वृत्ती अशी द्विधा आहे. आपणाला त्याची ओढ आहे आणि तिटकाराही आहे.

इतिहासाच्या निरिक्षणातून एक गोष्ट आपल्या ध्यानात येईल, ती ही की समाजात राहणारा प्रत्येक माणूस दोन वेगवेगळ्या दिशानी खेचला जात असतो. त्याला त्याच्या समाजाचा प्रामाणिक घटक म्हणूनही जगायचे असते. म्हणजे समाजाशी जुळते घ्यायचे असते. त्याच्याशी एकरूप व्हायचे असते. पण त्याच वेळी त्याला स्वतःसारखेही व्हायचे असते. एक वेगळा माणूस म्हणून जगायचे असते. थोडक्यात, सामाजिक बंधने तोडायचीही असतात.

हा सामाजिक माणसाच्या आयुष्याचा प्रधान कूटप्रश्न असतो. या प्रश्नाचे कोठलेही उत्तर काही प्रमाणात तरी नेहमीच खोटे, Fake असते. माणसाचे मन म्हणजे तर्कशास्त्राचे पाठ्यपुस्तक नसल्याने माणूस सतत एकाच दिशेने राहू शकत नाही. माणसाला पूर्ण समाजविरोधी व्हायचे नसते आणि पूर्ण समाजाभिमुखही व्हायचे नसते. माणसाला स्वतःसारखे व्हायचे असते. परंतु त्याला संपूर्ण स्वतःसारखे व्हावयाचे नसते. कारण त्याला एकट्यानेही राहावत नाही. त्याला इतरांचा सहवास हवा असतो. असो. तर समाजविघातक ओढ कोठल्याही माणसाच्या मनात जन्मतः आहे. आपण ज्या झुंजार आवेशाचा वर उल्लेख केला तो आवेश हा याच मूळ नैसर्गिक आक्रमकपणाचा एक थोडा वेगळा आणि वरच्या दर्जाचा प्रकार आहे. या आक्रमकपणाचा रोख गटाबाहेरच्या लोकांवर असतो. हुकूमशाह्यांच्या विशिष्ट प्रकारच्या रचनांमुळे कसल्या ना कसल्या वहाण्याने ते तो देशाबाहेरच्या लोकांकडे कळवू शकतात. लोकशाहीत ही जबाबदारी, पक्षीय संघटना व त्यांचे नेते उचलतात. साहजिकच तरुणांचे गट तेथे वेगवेगळ्या झेंड्याखाली जमा होतात. प्रत्येक पुढारी त्याच्या पक्षाच्या तत्वांसाठी तरुणांचा आवेश राबवू शकतो. जेव्हा कोणी एकटाच महाभाग एखाद्या पक्षाचा सर्वाधिकारी असतो तेव्हा हाच आवेश तो स्वतःच्या स्वार्थी महत्वाकांक्षेसाठी वापरतो. कसल्या ना कसल्या आक्रमक तत्वज्ञानाचे आमिष दाखवून त्यांच्यातल्या आक्रमक द्वेषाला खाद्य पुरवून. अर्थात समतोल विचाराचेही पुढारी लोकशाहीत असू शकतात. असे पुढारी तरुणाना रचनात्मक कार्यासाठी संघटित करू पाहातात. पण हा आवेश ही एक अशी गोष्ट आहे की विध्वंस व हिंसेकडे ती अधिक जोराने ओढ घेते. तेव्हा विचारांच्या प्रचाराचे स्वातंत्र्य लोकशाहीत असल्याने कोणी वैयक्तिक स्वार्थासाठीही तरुणांचा आवेश लुबाडू शकतात. एकमेकांविरुद्ध त्यांची मने कलुषित







करू शकतात. हुकूमशाहीत या प्रकाराचे स्वातंत्र्य कोणालाही मिळत नाही. तेथे आवेशाची भावना कशा प्रकारे फायदेशीरपणे राववायची याची काळजी शासन घेते. अर्थात मानवी हिताच्या अंतिम भल्यासाठी हुकूमशाही नव्हे तर लोकशाहीच उत्तम गोष्ट आहे हे आपण विसरता नये. कारण विचाराचे स्वातंत्र्य आहे म्हणजे स्वतःला पटेल असा जीवनमार्ग शोधण्याचे स्वातंत्र्य आहे.

तथापी देशात मोठा तरुणवर्ग असणे व त्या तरुणवर्गाच्या नैसर्गिक आवेशाला वाट व विषय न मिळणे ही गोष्ट देशाच्या हिताच्या व तरुणांच्या मानसिक आरोग्याच्या दृष्टीने ठीक म्हणता येत नाही. लोकशाही देशात तरुणवर्गासाठी समान राष्ट्रीय उद्दिष्ट शोधणे ही फार कठीण समस्या असते. हुकूमशाहीत हा प्रश्नच उद्भवत नाही, कारण परक्या शत्रूपासून देश आणि देशाची तत्वप्रणाली वाचविणे हे कायमचेच उद्दिष्ट तेथील सरकारपाशी असते. लोकशाहीत तरुणांसाठी अनेक प्रकारची ध्येये असतात. पण एकही समावेशक अगर राष्ट्रीय ध्येय तेथे असत नाही. लोकशाहीच्या मूलभूत भूमिकेप्रमाणे कोठल्याही परिस्थितीत राष्ट्र वा एखादी विवक्षित तत्वप्रणाली यांचे दैवतीकरण तेथे शक्य होत नाही. आणि असे कोठलेच दैवतीकरण नसल्याने सर्वस्वाचा होम करून ज्याची अनन्य निष्ठेने भक्ती करावी असेही काही तेथे उपलब्ध होत नाही. मानवी ध्येयांची विविधता ही बहुढंगी आणि प्रगल्भ व्यक्तित्वासाठी अत्यंत आवश्यक वस्तू होय हे तर खरेच. परंतु काही एका विशिष्ट वयोमानाच्या वेळी सामान्यतः १५ ते २० च्या दरम्यान जेव्हा मुलामुलींचे शरिर भरू लागलेले असते, मुलेमुली वयात येत असतात, तेव्हा अशा प्रकारच्या ज्यात झोकून घ्यायचे असते अशा सामुदायिक कार्यक्रमाची मुलामुलींना नितांत गरज असते. कारण शरीर सर्व दृष्टींनी भरत असतानाच्या या वयात मुलेमुली मनाने संरभैर झालेली असतात. आपल्याला काय होत आहे हेच त्याना त्या काळात समजत नाही. तसेच घराबाहेरचे, बाहेरच्या मित्रमैत्रिणी यांचेही त्यांचे आकर्षण एकदम वाढलेले असते. अशा वेळी उत्तेजित झालेली मानसिक-शारिरीक ऊर्जा जर त्याना काही उदात्त निष्ठाना लावता आली तर त्यांच्या मनाची उलघाल कमी होते नी त्या व्यवधानात ती अडकून राहातात. एकदा या वयाच्या बाहेर ती पडली की मग त्यांच्या उत्साहाचा गैरफायदा घेतला जाण्याची शक्यता बऱ्याच प्रमाणात मागे पडलेली असते. पण तरुण मुलांच्या दुर्दैवाने याच संस्कारक्षम वयात ती अनेक गुंड पुढाऱ्यांच्या हातात पडतात, सत्तेला (ऑथॉरिटी) आव्हान देण्याची जी उर्मी त्यांच्या रक्तात मळमळत असते तिचा गैरफायदा घेऊन ही मुले स्वतःच्या द्वेषमूलक कार्यक्रमाला हे पुढारी जुंपतात. हिंसावादी किंवा युद्धपिपासू पुढारी सळसळत्या रक्ताच्या या तरुणांची मने आणि कल्पनाशक्तीला फार लवकर काबीज करू शकतात. या वयात आक्रमक कार्यक्रमाच्या त्यांच्या स्वप्नांना या प्रकारच्या मूलतः रोगट मनाच्या



अनुक्रमणिका



पुढाऱ्याना सहजगत्या गैरफायदा उठविता येतो. फक्त त्या आक्रमक स्वप्नाला साजेशी काल्पनिक आव्हानांची प्रतिमा त्यांच्यासमोर मांडली की झाले !

अहिंसा किंवा शांततावादाच्या पुरस्कर्त्यांना विद्वेषक नेतृत्वाचे मार्ग उपलब्ध नसतात. त्यांच्या स्वीकृत वैचारिक भूमिकेमुळे द्वेषाच्या भावनेला आवाहन करून लोक ते संघटित करू शकत नाहीत. शत्रूचे बुजगावणे उभे करून लोक त्याना आपल्या पाठी जमविता येत नाहीत. कारण शत्रूची कल्पनाच त्यांच्या एकूण तत्त्वज्ञानात वसत नाही. प्रेम, सत्य, शांती, अहिंसा या ज्या मूल्यांसाठी शांततावादी प्रयत्न करू पाहातो ती त्याची मूल्ये नैतिक जबाबदारीच्या भावनेच्या वाढीतून निष्पन्न होतात. पण याच्याच मुळे मानवी मनात असणाऱ्या द्वेषमूलक भावनांचा आधार घेऊन त्याला स्वतःचे तत्त्वज्ञान लोकमानसावर ठसविता येत नाही. कारण मनन, चिंतन आणि आत्मनिरिक्षण याच्यावाचून ही मूल्ये मनात उतरत नाहीत. असो. मात्र यातही अशी दोन मूल्ये दाखविता येतील की जी स्वतःच्या स्वतःला पटू शकतात. उदा. माणसावद्दलचा स्नेह आणि त्याचे प्रेम आपण स्वानुभवावरूनही जाणू शकतो. प्रेम आणि स्नेह यातूनच सहृदयता व दयाशिलता यांचा जन्म होतो. कदाचित यांच्यामुळे मानवी आक्रमकपणाला आळा बसेल.

शांततावादी शांती व अहिंसेचा पुरस्कार करतात, म्हणून त्याना द्वेषमूलक प्रचाराचा उपयोग करून लोकाना स्वतःकडे ओढून घेता येत नाही. नाही म्हटल्यास या प्रकारचे केवळ एक आवाहन ते करू शकतात. 'जगातल्या पापाचा आणि दुष्टपणाचा बंदोबस्त करण्यासाठी अखिल मानवजातीने संघटित प्रयत्न करावयास हवेत' अशा प्रकारची जाहीर भूमिका शांततावादी घेऊ शकतात. या भूमिकेत माणसातल्या आक्रमक भावनाना काहीशी चालना आहे. पण त्यात दुसरीच एक अडचण आहे. पाप आणि दुष्टपणा या दोन्ही कल्पना अतिशय अस्पष्ट आहेत. पाप आणि दुष्टपणाची संशयातीत व्याख्या आजपर्यंत कुणाला करता आलेली नाही आणि पुढेही ती करता येईलसे वाटत नाही. पाप हे नेहमी तुलनात्मक असते. तीच गोष्ट दुष्ट या कल्पनेचीही. पाप किंवा दुष्टपणा या शंभर टक्के वस्तुनिष्ठ गोष्टी नाहीत. चांगल्याच्या विरोधी ते वाईट. पण चांगले हेच मुळी वैयक्तिक चांगले असते. चांगले आणि वाईट, सुष्टता आणि दुष्टता या व्यक्तिनिरपेक्ष अवस्था नाहीत. चांगल्याच्या उलटे ते पाप किंवा वाईट अशी व्याख्या वाईटाची कधी कधी केली जाते. पण तीही व्याख्या शंभर टक्के खरी नसते. कारण चांगले हे माझ्या किंवा तुमच्या दृष्टीतले चांगले असते. सर्वांसाठी निर्विवाद एकमेव चांगले असे क्वचितच काही दाखविता येईल. एक प्रत्यक्ष उदाहरणच आपण घेऊ. म्हणजे मोठमोठे बुद्धिमान पंडितही या बाबतीत कसा गोंधळ करतात हे आपल्या ध्यानात येईल. शास्त्रज्ञ मंडळींच्या मते ज्ञानाची

उपासना याच्याइतके सर्वश्रेष्ठ मूल्य जगात कोठलेंही असू शकत नाही. समजा, यावर जर कोणी असा आक्षेप मांडला की नव्या शोधामुळे मानवजातीचे जेवढे फायदे होतात तेवढेच तोटेही होतात. म्हणून शास्त्रीय संशोधन हे तारतम्याने केले जावे. अनिर्बंध संशोधन कदाचित जगाच्या अंतिम संहाराला कारणीभूत होईल. शास्त्रज्ञांच्या संशोधनावर, निदान ठराविक संशोधनावर तरी, बंदी आणण्यात यावी हा विचार बहुतेक सर्व शास्त्रज्ञाना पसंत पडणार नाही. ते म्हणतील की शास्त्रावरची ही टीका दुष्टबुद्धीची आहे. वास्तविक शास्त्रज्ञानी तरी सर्व बाबतीत तटस्थ राहून विचार करावा अशी आपली अपेक्षा असते. पण शास्त्रज्ञ आपली वस्तुनिष्ठ संशोधकाची भूमिका विसरतात आणि भावनात्मक भांडताण सामील होतात. कारण त्यांच्या गटावर वाहेरून हल्ला केला जात होता. साहजिकच त्यांचा आवेश चेतवला होता. हे घडून येते कारण 'पाप, दुष्टता' या टेबल, खुर्चीमारख्या प्रत्यक्षगत वस्तू असून हात लावल्यास हाताना त्या जाणवतील असे आपणास वाटते. 'पाप, दुष्टता' या सर्व कल्पना असतात· केवळ संकेतचिन्हे. आणि त्या संकेतचिन्हे असल्याने जड वस्तूंसारखे अस्तित्व त्याना नाही. कल्पना नेहमी स्थलकालपरत्वे वदलतात. एवढेच नव्हे तर ती ती कल्पना वापरणाराच्या वैयक्तिक पूर्वग्रहांचाही परिणाम त्या त्या कल्पनेवर होत असतो. कोठल्याही बौद्धिक रचना या प्रथम रचना असतात. मागाहून त्या वस्तू बनतात. पण कल्पनेतल्या बौद्धिक रचनांचा रंग वापरणाराच्या मनावर ठरतो. पण आपणाला या सत्याचा विसर पडतो. आणि आपण 'पाप, दुष्टता' इत्यादींच्या नावाने धर्मयुद्धाचा पुकारा देतो. आपल्या कल्पनेत जे मला पाप वाटते तेच जगातल्या यच्चयावत सर्व लोकानाही वाटावे. जगात अनेकवार हे घडले आहे. बौद्धिक रचना जड वस्तू मानल्या गेल्याने लक्षावधी लोकाना प्राण आणि वित्ताला मुकावे लागले आहे. अमूर्त कल्पनाना वास्तव वस्तू मानल्याने माणसाची सारासारबुद्धी नष्ट होते हे जर माणसाने बरोबर ध्यानात घेतले तर जगातले बरेचसे पाप आणि दुष्टता अदृश्य पावतील.

[ क्रमशः ]

---

आमच्या आजूबाजूला उंदीर खुडबूड करताहेत ही एक आनंदाची परिस्थिती म्हणावी लागेल. कारण आमचे जहाज सोडून उंदीर अद्याप पळून दूर गेले नाहीत याचा अर्थ आमचे जहाज अजून बुडण्याच्या मार्गावर नसले पाहिजे.

—एरिक हॉफर





# मानसशास्त्र

## कला–काही विचार

—विश्वास पाटील

कला म्हणजे आशयाचे आकाराबरोबर लग्न. आशय आणि आकारापैकी आकार बाह्य वास्तवाच्या निरिक्षणातून गवसतो असे म्हटले तर आशय साहजिकच आतल्या वास्तवातून मिळतो असे म्हणता येईल. अर्थात हे सांगताना कलाकृतीला ही दोन अंगे असतात एवढेच आम्हाला सांगायचे नाही. आम्हाला आणखी असे सांगायचे आहे की ही दोन अंगे कलानिर्मितीसाठी अपरिहार्य आहेत. ती नसतील तर कलाही नसेल. तथापी प्रत्येक कलाकृतीत आशयाचा आणि आकाराचा असे दोन्ही भाग असले तरी प्रत्येक खेपेस वा प्रत्येक वेगवेगळ्या शैलीत त्यांचे प्रमाण समान वा पूर्वानिश्चित असते असे नव्हे. हे प्रमाण सतत बदलत असते. समजा, रोमँटिक, अभिजात, अमूर्त अथवा उत्स्फूर्त अशा चारपाच कलाशैली घेतल्या आणि त्यातील या दोन घटकांचे प्रमाण तपासले तर ते कधीही सारखे आढळणार नाही. हे प्रमाण सारखे बदलत असते. बदलणे हाच त्याचा विशेष आहे. बोध–अबोधाचे कलाकृतींतले प्रमाण बदलते एवढेच नव्हे तर या दोघांचे प्रत्यक्ष बाह्य स्वरूपही बदलते. म्हणजे त्यांचा जो अनुभव आहे तोही बदलतो. हे का घडते, किंवा कशा प्रकारे घडते याचे निर्विवाद उत्तर कदाचित आपण देऊ शकणार नाही पण हे घडते ही गोष्ट संशयातीत आहे.

एकच कलाकृती दोन वेगवेगळ्या वेळी पाहिली तर प्रत्येक खेपेस ती वेगळी भासते असे आताच आपण म्हटले. साधे नाटकाचेच उदाहरण घ्या. नाटकातला एक महत्त्वाचा भाग म्हणजे त्यात ग्रथित झालेला काळ. हा काळ पात्रांच्या आयुष्याशी संबंधित असेल किंवा नाटककाराने जीवनासंबंधी जे व्हिजन घेतले असेल त्याच्याशी संबंधित असेल. तसेच ते नाटक जितके तास टिकेल तोही नाटकाचाच काळ म्हणता येईल. आता हे वेगवेगळे ' काळ ' प्रेक्षकाला कसे जाणवतात ? असा प्रश्न विचारता येईल. घड्याळाच्या हिशेबाने नाटक मोजले तर आपण म्हणू की नाटक तीन तास टिकले. पण हे तीन तास हाच त्या नाटका-तला काळ होता काय ? समजा, तीन तासाचे दुसरे नाटक तुम्ही पाहिलेत तर दोन्ही नाटके तुम्हाला सारखीच वाटली काय ? माझी खात्री आहे की तुम्ही

नक्की ' नाही ' असे उत्तर द्याल. एक नाटक फार लवकर संपल्यागत वाटेल. दुसरे फार लांबल्यागत. वास्तविक काळाचा जर एकच प्रकार अस्तित्वात असता तर असे घडले नसते. पण काळ आपण वेगवेगळ्या मार्गाने मोजतो. घड्याळ्याच्या मापाचा काळ हा सार्वजनिक काळ असतो. एकाच ठिकाणी राहाणाऱ्या सर्वांना सारखा. हा काळ, काळाचे अवकाशीकरण ( Spacialization ) करून आपण मोजतो. असके अंतर ओलांडण्यासाठी लागणारा वेळ ते काळाचे एक माप. पृथ्वीच्या स्वत:भोवतीच्या फेरित पृथ्वीला मूळ बिंदूवर येण्यासाठी लागतो तो काळ म्हणजे एक दिवसरात्र. एकदिवसरात्र बरोबर चौविस तास. एक तासाचे भाग साठ. इत्यादी. हा सार्वजनिक काळ. याच्या उलट आपल्या आतही काळाचा एक निराळा अनुभव आपण घेत असतो. मगाशीच आपण पाहिले की घड्याळाच्या मापाने दोन्ही नाटके तिन तासांची होती. पण त्यातील एक फार छोटे वाटले आणि दुसरे फार मोठे. गंमत म्हणजे यातील एकही नाटक कंटाळवाणे नसूनही तसे घडले. हे घडू शकले कारण काळ आम्ही अगदी खाजगी पद्धतीनेही अनुभवित असतो. मित्राच्या सहवासातला एक तास क्षणांगत वाटतो. नको असलेल्या पाहुण्याच्या सहवासातले काही क्षण तासांगत वाटतात.

दोन वेगवेगळ्या नाटकांचे उदाहरण न घेता आपण परतपरत पाहिलेल्या एकाच नाटकाचे उदाहरण घेऊ. म्हणजे पुनरावृत्तीचे उदाहरण घेऊ. एकच गोष्ट पुन्हा केली की ती काहीशी शास्त्रीय प्रयोगागत बनते. अर्थात काहिशी. पूर्णत्वाने नव्हे. समजा, एकच नाटक मी दोनदा पाहिले, नाटकात पात्रे तीच होती, रंगमंच, दिग्दर्शक सर्व तेच होते. मग मी एकच नाटक पाहिले होते की मी दोन वेगवेगळी नाटके पाहिली होती ? आपल्या प्रश्नाचे उत्तर होय आणि नाही असे दुहेरी येईल. नाटकाऐवजी आपण पेंटिंगचे उदाहरण घेऊ. पेंटिंग तरी काल जे होते तेच आज असेल की नाही ? तत्त्वत: दोन्ही वेळा मी एकच पेंटिंग पाहात होतो. पण मी एकच पेंटिंग पाहात नव्हतोही ! कारण दोन्ही वेळचा ' मी ' एकसारखा नसतो, कालचा मी वेगळा, आजचा वेगळा ! कालच्याचे मनोविकार, मूड निराळे, आजच्याचे निराळे, आणि मी पाहात असतो ती जड आणि स्थिर वस्तू पाहात नसतो, मी चित्रकार आणि त्याचा चित्रविषय यातला परस्पर-संबंध पाहात असतो. अगदी बरोबर म्हणजे या परस्पर-संबंधाचे अनुभवणे (Experiencing) पाहात असतो. येथे वास्तव ' मी ' नसतो. तसेच वास्तव ते ' चित्र 'ही नाही, ' वास्तव ' मी आणि चित्र या दोघांचा संबंध होय, वास्तव संबंधवाचक– Relational असते. ते फक्त ' मी 'त नसते आणि ' चित्रविषयात'ही नसते. ते केवळ आत नसते आणि केवळ बाहेरही नसते, वास्तव हा ' मी ' आणि ' विषय ' यांचा संबंध आहे. चित्रकाराचे चित्र ही केवळ चित्रकार आणि त्याचा चित्रविषय यांच्यातील संबंधाची अभिव्यक्ती नसते. ते साक्षात अनुभवणे Experiencing

असते.–experiencing of certain relationships between the painter and the outside world. म्हणून आस्वादकही त्याच अनुभविण्यातून जातो. तोही चित्राशी तशाच प्रकारे संबंध जोडतो. नित्य नवा.

वास्तव वस्तुनिष्ठ आहे आणि व्यक्तिनिष्ठही आहे. आपणा प्रत्येकाच्या आत आहे तसेच बाहेर स्वतःच्या हक्काने आहे. आतले वास्तव हा कधीही बाहेरच्या वास्तवाचा जसाच्या तसा ठसा असत नाही. ना बाहेरचे वास्तव आतल्याचा ठसा. आतल्या वास्तवाचा काही ढोबळ भाग आपल्या पूर्वजांकडून त्यांच्या अनुभवांच्या अवशेषरूपाने आपणाकडे आलेला असतो. तर काही जन्मापासून बाहेरच्या जगाशी जो संबंध आम्ही जोडतो त्यातून बांधला गेलेला असतो. हे भाग अर्थातच तर्कशुद्ध स्वरूपात असत नाहीत. कारण प्रारंभी आपणाला तर्काची भाषाच अवगत नसते. नव्हे ज्याला आपण भाषा म्हणतो ती शाब्दिक कल्पनांची भाषाच तेव्हा आपणापाशी असत नाही. तेव्हा आपणापाशी फक्त चित्रे असतात. निरनिराळे आकार. माणसाची स्थिती स्पष्ट करणारी काही मानसिक प्रतिबिंबे. छाया. या चित्रानाही आपण भाषा म्हणू शकतो. जर चित्राना भाषा मानले तर त्यांच्या साहाय्याने चालते तीही विचारक्रिया म्हणता येईल. अर्थात नेहमीच्या शब्दसंकल्पनाधिष्ठित विचारप्रक्रियेपेक्षां भिन्न. चित्रमालिकांच्या मदतीने घडू शकणारी ही विचारप्रक्रिया अत्यंत गतिमान असते. तसेच आशयाच्या दृष्टीने तिचा आवाकाही मोठा असतो. आई ही एक चित्रप्रतिमा घ्या. या एका प्रतिमेच्या ठिकाणी अगणित आशय सूचित करण्याची शक्ति आहे. या आशयात अनेक शारिरीक संवेदनांचाही सामावेश असेल. केवळ ही प्रतिमा नजरेसमोर येताच माणसाचे मन मैलोन् मैल पाठीमागे जाऊ शकते. आईची प्रतिमा डोळ्यासमोर येताच जी चलच्चित्रे डोळ्यांपुढून सरकतील तो शब्दात लिहून काढायची म्हटले तर पानांवर पाने खर्ची घालावी लागतील आणि ते करता करता ज्या अगणित अर्थछटा निसटून जातील त्या वेगळ्याच. माणूस आयुष्याला सुरवात करतो तीच मुळी फँटसींच्या, चलत्‌चित्रपटांच्या सहवासात. या फॅन्टसी म्हणजे दिवास्वप्ने नव्हत. दिवास्वप्नात थोडा का होईना शाब्दिक चालनांचा भाग येतो. फॅन्टसी या शब्दशक्ती विकसित होण्यापूर्वीची अवस्था आहे. मूल बाहेरच्या जगाशी या फॅटसींच्या मदतीने जमवून घेते. प्रत्यक्ष अनुभवात त्याला जे कमी पडते त्याची भरपाई ते फॅन्टसीच्या पातळीवर करते. या फॅन्टसी आपल्या नकळत सबंध आयुष्यभर मनातल्या मनात सुरू असतात. या फॅन्टसी म्हणजे आपणा प्रत्येकाची खाजगी भाषा. जीवनासंबंधीची खाजगी भाष्ये. ही भाष्ये शब्दपूर्व अवस्थेतील असतात. आणि अंतःस्फूर्ती हा त्यांचा एकमेव आधार आहे. हे एकेक भाष्य म्हणजे जीवनासंबंधीचा एकेक पूर्णानुभव म्हणता येईल किंवा एकेक पूर्ण साचा. जीवनासंबंधिची ही भाष्ये किंवा चित्रे ( रिफ्लेक्शन्स ) प्रारंभी सुप्त असतात.



अनुक्रमणिका

हळूहळू जीवनाचा किंवा बाह्य जगाचा अनुभव जमत जातो तसतशी ही ठळक बनत जातात. ज्याप्रमाणे आनुवंशिक पद्धतीने आलेली चित्रे मागाहून घेतल्या गेलेल्या अनुभवातून ठळक बनतात तशाच प्रकारे असंख्य नवी चित्रेही बाहेरून आत ओढून घेण्यात येतात. ( Introjection ) तसेच मूल प्रथम त्याच्या आईबरोबर व मागाहून इतर अनेकांबरोबर मनाने एकरूप होऊ पाहाते किंवा स्वत:च्या डोक्यातली कल्पनाचित्रे इतरांवर अध्यारोपित करून ( Identification and projection ) त्याना जाणून घेऊ पाहाते. त्यातूनही त्याच्या आतले जग बांधले जाते. थोडक्यात, माणसाचे पहिले जग हे कोणाबरोबरच्या तरी संबंधांचे जग असते. हे कोण म्हणजे साधारणत: त्याची आईच असल्याने हा संबंध एका जिवंत माणसाचा दुसऱ्या जिवंत माणसाबरोबरचा असतो. प्रथमत: आणि मुलत: माणसाचे आतले जग हे जिवंत माणसाबरोबरच्या संबंधांतून बांधले जाते. मागाहून त्यात जड जगाबरोबरच्या संबंधांची नि अनुभवांची भर पडते. मानसशास्त्राच्या भाषेत सांगायचे तर असे म्हणता येईल की कोठल्याही माणसाच्या आयुष्यात त्याची आई हेच पहिले ऑब्जेक्ट–पहिली वस्तू असते. मुलाच्या दृष्टीने विचार करता हेच त्याचे संपूर्ण विश्व. प्रारंभी मूल या विश्वाशी एकरूप असते. आईच्या आकृतीशी संबंध जोडीत जोडीत, कधी तिच्याशी मनाने एकरूप होत, कधी मनाचा तडफडाट होऊ देत, तर कधी स्वत:च्या मनच्या कल्पना तिला चिकटवीत ( 'मी तिचा द्वेष करीत नाही तर ती माझा द्वेष करते' इत्यादी ) मुलाचे आंतरविश्व बांधले जाते. पहिले काही महिने आई आणि आपण ही दोन पृथक् शरिरे आहेत हेच मुलाला कळत नाही. हळूहळू हे सत्य त्याला उमगू लागते. त्यातून अनेक प्रकारचा मानसिक त्रास त्या मुलाला होतो. कारण आता एकात्मतेचा आनंद भंगतो. नंतर शब्द येतात. शब्दांवर आधारित कल्पना येतात. मी वेगळा इतर वेगळे ही जाण येते. पण एके काळी मी–तूच्या भेदापलिकडचा जो स्वर्गीय आनंद आपण घेतलेला असतो त्याची पुसट स्मृती मनात कोठेतरी घर करून असतेच.

आमची जगे दोन आहेत. एक खाजगी, आतले. दुसरे सार्वजनिक, बाहेरचे. या दोन जगात क्वचितच कधी एकरूपता, एकवाक्यता, मिलाफ असतो. सामान्यत: त्यात ओढाताणच असते. पण कधी कधी एखाद्या अकल्पित क्षणी अशी एकरूपता येते निर्माण होते. आणि अनुभवाचे सगळे रूपच त्या क्षणी पालटून जाते. अनुभवाचा कायापालट होतो. हे घडू शकते कारण त्या वस्तूच्या ठिकाणी आमचे आतले जग आणि आमचे बाहेरचे जग यांचा एकमिलाफ झालेला असतो. संबंध हे येथले अत्यंत महत्त्वाचे सूत्र आहे. दोन भिन्न दिवशी पाहिलेले चित्र दोन भिन्न अनुभव देते कारण त्या त्या दिवशींचा आमचा 'मी' ही भिन्न असतो. अनुभवणे ही केवळ प्राथमिक वास्तवता आहे. आणि हा अनुभव ऑब्जेक्टबरोबरच्या

संबंधाशी निगडीत आहे. द्रष्टा व दृश्य, कर्ता व विषय यांच्यातल्या संबंधाशी. द्रष्टा व दृष्य या दोन वेगळ्या घडामोडी आहेत. आणि त्या घडामोडींच्या परस्पर देवाणघेवाणातून Transfiguration स्वर्गीय रूपत्वाचा तो आगळा अनुभव साकार होत असतो. या दोन टोकांना अनेक भिन्नभिन्न नावे आहेत.

१ ) कोणी त्याना कल्पनाशक्ती व कृती ( Imagination and action ) म्हणतात.

२ ) कोणी स्वप्न आणि वास्तव ( Dream and Reality ) म्हणतात.

३ ) कोणी आत ओढून आत्मसात केले गेलेले वातावरण आणि बाह्य वातावरण ( Incorporated environment external environment )

( वातावरण हा शब्द येथे व्यापक अर्थाने वापरण्यात आला आहे. वातावरण म्हणजे मानवी आणि नैसर्गिक असे दोन्ही प्रकारचे वातावरण ).

या दोन घटिताना तुम्ही कसलेही नाव द्या. पण ती पृथक् वास्तवे आहेत ही वस्तुस्थिती त्यामुळे बदलत नाही. आणि ती दोन्ही जेव्हा एकमेकाशी बरोबर जमतात तेव्हा माणसाला संघर्ष मिटल्याचा आनंद होतो. कारण फार पूर्वी केव्हातरी ही दोन्ही वास्तवे मिळून माझ्या मनात एकच वास्तव होते. आता गंमत अशी आहे की आतल्या आणि बाहेरच्या वास्तवापैकी बाहेरचे वास्तव जरी जसेच्या तसे राहिले तरी आतले वास्तव सतत पालटतच असते. रूपबदल, अस्थिरता, Changeability हाच त्याचा एकमेव स्थायीभाव आहे. मनोविकारातल्या प्रत्येक बदलाबरोबर आतल्या वास्तवात बदल घडतो. विशेषत: स्वत:च्या मनाच्या ठिकाणचे जे जे मनोविकार माणूस स्वत:पासून दडवून ठेवू पाहातो ते ते मनोविकार स्वत:चा जबरदस्त प्रभाव आतल्या वास्तवावर चालवतात. तुमच्या मनात जगाबद्दलचा द्वेष असतो नि तो द्वेष तुम्ही स्वत:शी कबूल करीत नाही तेव्हा तुमचे आतले आणि बाहेरचे, दोन्ही जगे आतल्या द्वेषाने गढूळ बनतात. मूड बदलला की आतले वास्तव बदलते. आतले वास्तव बदलले की बाहेरच्या वास्तवाचा चेहरा बदलतो. एकच पेंटिंग दोन भिन्न खेपेस भिन्न भावते. कारण नव्या खेपेला तुम्ही स्वत:ही नवे असता. नव्या प्रकारे अर्थसंपन्न. आस्वादाचा संबंध ही येथील प्राथमिक वास्तवता आणि आस्वादक व आस्वादविषय ही या संबंधाची दोन टोके.

× × × ×

# कला – युंग, रँक आणि कलाविचार

•

कोठलीही व्हायटल् कला आशयाने रसरसलेली असते. हा आशय त्या संस्कृतीच्या मानसिक प्रकृतीतून–तिच्या सेल्फमधून (यूंग; रँक यालाच विल् म्हणतात) तेथे येतो. संस्कृतीची मानसिक प्रकृती त्या संस्कृतीच्या सर्व घटकांना समान असते. सेल्फ वा विल् म्हणजे सांस्कृतिक अर्थांचे वा आशयांचे कोषभांडार Meaning–matrix. या कोषभांडाराला हृयूझेर्ल हे प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ते Intentionality असे नाव देतात. Intentionality म्हणजे Intent कडे असणारा मानवी मनाचा ओढा व अशा इंटेन्टसचा एकत्रित संग्रह. हृयूझेर्ल यांच्या मते मानवी मन स्वाभाविकपणेच अर्थपूर्ण आशयांकडे ओढ घेत असते. मन बाहेर वा आत जे काही पाहाते ते नेहमी अर्थपूर्ण साच्यातच पाहू शकते. अशा साच्या-व्यतिरिक्त त्या मनाला काही पाहाताच येत नाही. कारण काळ आणि अव-काशाच्या तीन मिती यांच्या चाळणीतूनच मनाला जग पाहावे लागते. मनाची इच्छा असली तरी वेगळ्या प्रकारे जग मनाला पाहाताच येणार नाही. पाहाणे म्हणजे दृश्य आणि त्या दृश्यापेक्षा वेगळी पार्श्वभूमी याच साच्यात आपणाला पाहावे लागते. आपण जेव्हा एखादा आकार पाहातो तेव्हा आपल्या ज्ञानतंतूंच्या मदतीने इतर आकारांपासून तो आकार जणू वेगळा करतो आणि असा वेगळा करून पार्श्वभूमी–पुरोभूमी याच क्रमात पाहातो. जेव्हा पार्श्वभूमीपासून एखादा आकार आपणाला वेगळा काढता येत नाही तेव्हा तो आकारही आपणाला पाहाता येत नाही. म्हणजेच पाहिला तरी ओळखता येत नाही. कारण अशा वेळी समोरचे सगळेच दृश्य संदिग्ध असते. माणूस हा संकेत–चिन्हवाला (Symbolical) प्राणी आहे. तो जे जे पाहातो त्याचे सांकेतिक चिन्ह स्वतःच्या मनात तो साठवून ठेवतो. या सगळ्या सांकेतिक चिन्हांचा वा चित्रांचा आणि व्याख्यांचा एकत्रित साठा म्हणजे त्याच्या intents चा साठा. अर्थांचा कोषागार. बाहेरून चालना येताच या कोषागारात चाळवाचाळव होते आणि बाहेरील आकाराला साजेसे चित्र, चिन्ह वा आकार आतून बाहेर येऊन बाहेरच्या आकाराला जणू गवसणी घालतो. आपल्या अदृश्य ज्ञानात पकडतो. म्हणून जितके आकार किंवा आशय व अर्थ एखाद्या संस्कृतीपाशी असतील तितके अर्थ व आशय त्या संस्कृतीच्या घटकांच्या कोषागारात असतील. अर्थांचे हे कोषागार आपण आनुवंशिकतेच्या प्रत्यक्ष अनुभवाच्या कायद्याने मिळवितो. जे अर्थ त्या संस्कृतीला माहित नाहीत ते म्हणूनच आपल्या कोषागारात असत नाहीत. अर्थ हा शब्द येथे फार व्यापक अर्थाने योजलेला आहे हे ध्यानात ठेवावयास हवे. कोठलाही अर्थपूर्ण अनुभव

म्हणजे अर्थ. या अर्थात ज्याप्रमाणे वस्तुनिष्ठ घन आकार ( टेबल, खुर्ची, बोट, विमान इत्यादी ) येतील त्याचप्रमाणे व्यक्तिनिष्ठ, खाजगी भावभावना, मनोविकार, मूडस् थोडक्यात, अमूर्त कल्पना ( दया, करुणा, राग, लोभ, प्रामाणिकपणा, खोटेपणा इत्यादी ) याही येतील. एखादा अर्थ वा आकार आपल्या संस्कृतीच्या कोषागारात नसेल तर तो आपल्याही मनात नसेल. बॉटनी बेच्या बेटात जेव्हा कॅप्टन कुकची बोट पहिल्याने गेली तेव्हा तेथील मूळ रहिवाशाना ती बोट, बोट म्हणून पाहाता येत नव्हती. कारण बोटीच्या आकारावर त्याना आपले लक्ष स्थिर करता येत नव्हते. त्यांच्या संस्कृतीत बोट पूर्वी नव्हती. म्हणून बोटीचे चित्र वा चिन्हही त्यांच्या आशय–कोषागारात नव्हते आणि अशी परिस्थिती होती म्हणून मनाने त्याना बोटीचा आकार कवटाळता येत नव्हता. सांस्कृतिक अर्थांच्या कोषागारालाच युंग सेल्फ म्हणतात आणि रँक विल् वा लाइफविल् म्हणतात.

रँक यानी वापरलेला विल् वा लाइफ-विल् काही अकारण गैरसमजाना वाव देणारा आहे. एकतर विल् हा शब्द मराठी भाषेत आपण एक विशिष्ठ प्रकारची मानसिक शक्ती—इच्छाशक्ती—म्हणून वापरतो. रँक याना मनाचा निग्रहीपणा, हट्ट हा अर्थ अभिप्रेत नाही. दुसरी गोष्ट अशी की विल् किंवा इच्छाशक्ती हा शब्द आला की 'इच्छाशक्तीचे स्वातंत्र्य' इत्यादी तात्विक प्रश्न पुढे उभे राहातात. रँक याना त्याही प्रश्नात रस नाही. त्यानी मानवी जीवन आणि संस्कृती यासंबंधी जी भूमिका घेतली आहे त्या भूमिकेत या प्रश्नाला वाव नसतो. कारण त्यांच्या भूमिकेप्रमाणे मानवी जीवनाच्या रचनेत स्थिती आणि गती या दोन्ही गोष्टी अंतर्भूत असतात. माणूस देह म्हणून जन्माला येतो नि हा देह काळाबरोबर वाढत असतो नि वाढताना जे काही अनुभव तो गोळा करतो ते तो सतत स्वतःबरोबर वागवतो. या दृष्टीने माणसाच्या जीवनाला स्थितीची कायम मिती आहे. पण त्याजबरोबर माणूस मरेपर्यंत जगणार असल्याने व त्याच्या भविष्यकाळात काही ना काही नवे घडणार असल्याने त्याच्या आयुष्याची एक मिती मोकळीही आहे. माणसाचे आयुष्य अशा प्रकारे भूतकाळ आणि भविष्य-काळ किंवा स्थिती आणि अगणित शक्यतांची गती अशा दोन विंदूत ताणलेले आहे. थोडक्यात स्वातंत्र्य –या अगणित शक्यतानी दिलेल्या मर्यादातले स्वातंत्र्य हा मानवी जीवनाचा स्थायीभाव आहे. मानवी जीवनाची ती प्राथमिक वास्तवता. इतर वास्तवता तेथे मागाहून येतात. रँक आणि युंग हे जीवनाविषयी हा दृष्टी-कोन घेतात म्हणूनच ते मानसिक रुग्णाना बरे करु पाहतात. कारण त्याना हे माहित आहे की आपल्या स्वातंत्र्याच्या शक्यता चुकीच्या पद्धतीने हाताळल्याने माणसे मनोरुग्ण बनतात. ही चूक दुरुस्त करता येते नि दुरुस्त करता आली तर रुग्णाईताचे रूपांतर निरोग्यात करता येते.

नियतीवादी आणि अनियतीवादी ( Determinist and Indeterminist ) जेव्हा इच्छाशक्तीच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नाची चर्चा करतात तेव्हा तो प्रश्नच ते अत्यंत चुकीच्या संदर्भात सोडवू पाहातात. हे दोघेही इच्छाशक्तीला ( Will ) प्रत्यक्ष वस्तू समजतात. खुर्ची, टेबलागत. पण एकदा का इच्छाशक्तीला तुम्ही जड वस्तू मानले, इच्छाशक्तीचे जड वस्तूकरण केले की स्वातंत्र्याच्या प्रश्नाचे उत्तरच अशक्य होते. कारण जड वस्तूला मूलभूत स्वातंत्र्य असू शकत नाही. इच्छाशक्तीला वस्तू मानल्यानंतर नियतीवादी असा युक्तिवाद करू लागतात की इच्छाशक्ती तुमच्या मनातील क्षणोक्षणी बदलणारे मनोविकार, विचार, निश्चयशक्ती यांच्यावर अवलंबून असते. म्हणजेच ती स्वायत्त नाही. ती परतंत्र आहे. याच्या उलट अनियतीवादीसुद्धा नियतीवाद्यांचेच इच्छाशक्तीच्या जडत्वाचे मूळ प्रतिपादन घेऊन इच्छाशक्तीच्या स्वायत्ततेचे प्रमेय सोडवू पाहातात. पण अनियतिवाद्यांच्या वैचारिक चौकटीत राहून इच्छाशक्तीच्या स्वायत्ततेचा प्रश्न कधीच कोणाला सोडविता येण्यासारखा नाही. कारण विल् काय किंवा इच्छाशक्ती काय एकदा का तुम्ही त्याना जड वस्तू मानले की स्वायत्ततेची कल्पनाच एक कपोलकल्पित बनते. रँक अथवा युंग विल ( वा सेल्फ ) आणि मानवी स्वातंत्र्याची चर्चा करताना स्वातंत्र्याला माणसाच्या आयुष्यातील प्राथमिक वास्तवता मानतात. माणूस जन्माला येतानाच स्वातंत्र्य बरोबर घेऊन –विल् वा सेल्फमध्ये ज्या ज्या शक्यता अंतर्भूत असतील त्या शक्यतांची शक्यता बरोबर घेऊन–जन्माला येतो. या शक्यता कदाचित वास्तवता बनतील. कदाचित त्या मोफत जातील; वास्तवात येणार नाहीत. पण म्हणून मानवी स्वातंत्र्याच्या मूळ प्रमेयाला त्यामुळे बाध येत नाही.

× × × ×

कदाचित झोपेत आपण विचाराने वागत नसू; पण जागेपणी मात्र निश्चितच आपण विचाराने वागतो ( बोध मनाच्या प्रभावाखाली वागतो ) असे आपणास वाटते. वस्तुत: जागेपणीचे आणि झोपेतलेही आपले बरेचसे वर्तन आपल्या मनाच्या ठिकाणी हालचाली–सूचक जो आंगिक ठसा असतो त्य:प्रमाणे घडत असते. या बाबतीत आपण आणि इतर अगणित प्रकारचे कनिष्ट प्राणी यांच्यात फारसा फरक नाही. अर्थात विशिष्ट प्रसंगी विशिष्टच हालचाल का केली याचे तात्त्विक स्पष्टीकरण आपल्याशी नेहमी तयार असते. पण ही स्पष्टीकरणें पश्चात–समर्थनाच्या–Rationalizations च्या जातीची असतात. मात्र आपल्या बऱ्याचशा हालचाली विचाररहित असतात म्हणजे त्या 'तर्कास' सोडून असतात असे नव्हे. कारण त्या चिकित्सक बुद्धीने केल्या गेल्या नसल्या तरी ज्या दुसऱ्या बुद्धीने केल्या जातात तीही बुद्धी तर्काधिष्ठितच असते असे म्हणता येते. आपली

चिकित्सक बुद्धी शाब्दिक प्रतिमा व व्याख्यांच्या आधारे चालते. ही दुसरी बुद्धी चित्रप्रतिमा व त्या चित्रप्रतिमांच्या तार्किक चौकटीत कार्य करते. आपली चिकित्सक बुद्धी ही आपल्या व्यक्तित्वातली अलिकडची भर आहे. पण आपले भावनिक मन किंवा ज्याला आताच आपण चित्रप्रतिमांची चौकट म्हटले ती चौकट प्रारंभिक रचना आहे. आपली तार्किक बुद्धी होकार–नकार किंवा वाद-प्रतिवादाच्या ( Negations, contradictions ) चौकटीत कार्य करते. ( 'अ' फक्त 'अ' असतो. तो त्याच वेळी 'न–अ' असू शकत नाही. ) आपली दुसरी भावनिक बुद्धी Contraries भेद–विभेदांच्या संयुक्त चौकटीत कार्य करते. याच स्वाभाविक बुद्धीला काही जण Transcendental भेदाभेदाच्या पलिकडची बुद्धी असेही म्हणतात. या बुद्धीचा विशेष हा आहे की माणसाचा विचार करताना ती सर्वांगिण माणसाचा विचार करते. चिकित्सक बुद्धी, माणसाची केवळ तार्किक बुद्धी हीच तेवढी खरी बुद्धी आणि माणूस म्हणजे फक्त त्याची तर्कनिष्ठ बौद्धिकता असे गृहित धरून विचार करते. ही धारणा अर्थात एकांगी असते. माणूस म्हणजे फक्त तर्कनिष्ठता नव्हे. माणसात भावनेचाही भाग आहे. असो. तर सांगायची गोष्ट अशी की आपले बरेचसे जीवन आपल्या या तर्कातीत बुद्धीच्या वर्चस्वाखाली जाते.

आपले बरेचसे वर्तन Mindless–मनोरहित असते. मनोरहित म्हणजे बिन-डोक नव्हे. मनोरहित म्हणजे ज्यात विवेचक बुद्धीचा वापर करावा लागत नाही असे. आपण संकेतचिन्हींची व्यवस्था विकसित केली असल्याने आणि एकमेकाशी संबंध ठेवताना या संकेतचिन्हाचा सतत वापर करीत राहिल्याने आपले सर्वच वर्तन बुद्धिनिष्ठ असावे असे आपण समजतो. परंतु मुंगी अथवा मधमाशीचे आयुष्य जितके आणि जसे उपजत असते तितकेच आपलेही आयुष्य उपजत आहे. अनेकाना कदाचित वरील विधान आवडणार नाही. कित्येकाना त्याचा रागही येईल. पण प्राणी आणि वातावरण यांचा एकत्रित अभ्यास करणारे प्राणी-परिसरआचारशास्त्र – Ecology नावाचे जे शास्त्र आहे त्या शास्त्राचाच हा निष्कर्ष आहे. हे शास्त्र सांगते की मनुष्यप्राण्याचे बरेचसे वर्तन Unthinking किंवा अबुद्धिपुरस्सर असते. याचाच अर्थ असा की न–विचारातून विचाराचा विकास झाला आहे. बुद्धीचा आधार न–बुद्धी, स्वाभाविक मन.

उपजत या शब्दाची फोड येथे आवश्यक आहे. प्राण्यांचे वर्तन उपजत असते याचा एक अर्थ ते अबौद्धिक असते. तसेच जर का त्या विशिष्ट प्रजातीच्या एका घटकाचे वर्तन आपणाला माहित असले तर त्या घटकाच्या वर्तनाप्रमाणे इतर सर्वांच्या वर्तनाचा अंदाज आपण करू शकतो. एक मुंगी काय करते हे समजले की बाकी सर्व मुंग्या काय करू शकतील हे आपण सांगू शकतो. प्राणी–परिसर-आचारशास्त्रालाच पूर्वी Instinct शास्त्र म्हणत असत. इंस्टिंक्टच्या बाबतीत

एक गोष्ट नेहमी लक्ष्यात ठेवावयास हवी. कोठल्याही प्राण्याचे सर्वच्या सर्व वर्तन इंस्टिंक्टप्रधान असत नाही. त्याच्या वर्तनापैकी काही इंस्टिंक्टप्रधान तर काही अनुकरणप्रधान असते. म्हणजे चुका नि चुकांची दुरुस्ती करीत घडत गेलेले असते. जन्मतःच जे वर्तन प्राणी स्वतःबरोबर आणतो आणि जे त्याच्या जातभाईना समान असते त्यालाच आपण इंस्टिंक्ट म्हणतो. इंस्टिंक्टचे ठसे जन्मतःच आपण बरोबर आणतो, आणि ते ते प्रसंग येताच ते ते इंस्टिंक्ट व्यक्त होते. ही वर्तने शिकावी लागत नाहीत. चालनेला तत्काळ दिले जाणारे प्रतिसाद ती इंस्टिंक्टस्. डोळ्याची उघडझाप, धक्का बसताच दचकणे इत्यादी अनेक प्रतिक्रिया इंस्टिंक्टस्मध्ये मोडतील.

सर्वच प्रकारच्या इंस्टिंक्टसचा विचार येथे अभिप्रेत नाही. फक्त निश्चित ठसा असलेल्या इंस्टिंक्टसचा विचार येथे आपणास करायचा आहे. उदा. वीण-काळातील घरटी बांधण्याकडची पक्ष्यांची प्रवृत्ती; प्रचंड आकाराच्या पोळ्यातही स्वतःचे नेमके स्थान शोधून काढण्याचे मधमाश्यांचे कौशल्य; प्राण्यांचे अपत्यप्रेम; स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांची स्थलांतरांची उपजत आवड; इत्यादी प्रवृत्ती इंस्टिंक्टमध्ये मोडतात.

प्राण्यांची वर्तने उपजत असतात आणि अनुकरणप्रधानही असतात. मग या दोन वर्तनातला ठळक फरक कोणता? उपजत वर्तने ही प्रजातीच्या सर्व घटकाना समान असतात. (अर्थात त्यांची तीव्रता कमीजास्त असेल.) प्रत्येक प्रजातीचे वर्तन काही विशिष्ट प्रकारचे असते. मुंगीचे एका प्रकारचे. मधमाशीचे दुसऱ्या प्रकारचे. वगैरे. दोन उपजत वर्तने प्रजातीविशिष्ट असतात किंवा वर्गविशिष्ट असतात. सर्वच सस्तन प्राण्यांची मुले न शिकविता स्तनपान करू शकतात. पण फक्त माकडीणीची पोरेच माकडिणीला बिलगून राहू शकतात. इतर सस्तन प्राण्यांची नाही.

बऱ्याच प्राण्यांची उपजत वर्तने प्रजातीविशिष्ट आहेत. म्हणजे असे की निसर्गात ती प्रजाती उत्पन्न झाल्यानंतर तिच्या ठिकाणी ती वर्तने उत्क्रमित झाली आहेत. घोड्याच्या जातीचे उपजत गुणधर्म निसर्गात घोड्याची जात निर्माण झाल्यानंतर उत्क्रमित झाले. मांजराचे, सिंहाचे, कुत्र्याचेही तसेच. म्हणजे या प्राण्यांचा खास त्यांचाच फक्त म्हणता येईल असा निसर्गदत्त स्वभाव आहे. अर्थात निसर्गदत्त स्वभाव असणे आणि तो स्वभाव प्रगट होणे यात फरक आहे. स्वभाव प्रगट व्हावा अशी परिस्थितीच जर त्या प्राण्याच्या आयुष्यात उद्‌भवली नाही तर त्याचा तो विशिष्ट स्वभाव प्रगटही होणार नाही. पक्षी घरटी बांधतात. पण फक्त वीणकाळातच. एरवीच्या दिवसात नाही.

दोन, उपजत–वर्तने यांत्रिक आणि अत्यंत रिजिड असतात. तसेच ती स्वाभाविक असतात. ती करताना विचार करावा लागत नाही. उपजत–वर्तने रिजिड असतात म्हणजे ज्या चालनेची वा चालनांशी ती संलग्न असतात त्या

चालनांच्या बाह्य परिस्थितीत स्थित्यंतर झाले तरी ती पहिल्यासारखीच चालू राहातात. त्यांच्या मूळ स्वरूपात बदल घडून येत नाही. उपजत वर्तने ही Rituals किंवा कर्मकांडे असतात. मात्र याचा अर्थ या वर्तनांची अंतर्गत रचना साधी व सोपी असते असे नव्हे. अनेकदा ही वर्तने फारच कॉम्प्लेक्स असतात

कोठल्याही उपजत वर्तनाला दोन भाग असतात. एक भाग बाह्य चालनेचा व दुसरा त्या चालनेला देता येणाऱ्या प्रतिसादाचा. चालना आणि प्रतिसाद किंवा चेतक आणि प्रतिसाद Releaser and Response. Releaser म्हणजे Release किंवा मोकळे करणारा. रेस्पॉन्स म्हणजे त्या चेतकाला दिला जाणारा प्रतिसाद.

चेतक आणि प्रतिसादाच्या अशा अगणित साखळ्या प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणी असतात. या साखळ्या यंत्रवत कार्य करतात. त्या उत्स्फूर्तपणे चालतात. चेतक आणि प्रतिसादापैकी चेतकामध्ये अनेक घटक मोडतात. रंग, गंध, नाद, स्पर्श, आणि या सर्वांचे असंख्य बारकावे, शरिराचा बाह्य आकार, हालचाली, त्यातील तपशिल, नैसर्गिक परिसराचे विशेष, भूप्रदेशाची वैशिष्ठे यापैकी कोठलिही वस्तू चेतक असू शकते. चेतकाविना प्रतिसाद निकामी असतो. कधी चेतक वरीलपैकी फक्त एखाददुसऱ्या घटकाने बनतो. कधी अधिक घटकानी बनतो. चेतक संमिश्र असतो तेव्हा सर्वच्या सर्व वा अधिकांश घटक उपस्थित असतानाच प्रतिसाद प्रगट होऊ शकतो. उदा. एखाद्या प्राण्याचा प्रतिसाद काहीएक ठराविक गंध, नाद, आकार, तपमान या गोष्टींवर अवलंबून आहे तर या चारी गोष्टी हजर नसल्यास तो प्रतिसाद दाखविला जाणार नाही.

अंड्याचे बाह्य कवच फोडून नुकतेच बाहेर आलेले कोंबडीचे पिल्लू गोल आकाराच्या कोठल्याही वस्तूवर दाणा म्हणून चोच मारते. पुढे अनुभवाने त्याला दाणा आणि दगडी गोटा यातला फरक समजू लागतो. येथे गोलाकार वस्तूवर चोच मारण्याची क्रिया उपजत आहे आणि दाणे ओळखण्याची क्रिया शिक्षणाचा भाग आहे.

रॉबिन हा पक्षी कडवा प्रदेशाभिनी असतो. विशेषत: वीणकाळाच्या दिवसात जर दुसरा नर-रॉबिन त्याच्या वहिवाटीच्या प्रदेशात शिरला तर त्याच्यावर तो अगदी तुटून पडतो आणि त्याला आपल्या हद्दीबाहेर हुसकल्या-शिवाय गप्प बसत नाही. एक नर दुसऱ्या नराला त्याच्या लाल बगलांवरून ओळखतो. ही खूण नराच्या इतकी पक्की डोक्यात बसलेली असते की कावळ्याच्या किंवा मादिच्याही बगलाना जर लाल रंग दिला तरी त्यांच्याही अंगावर तो तुटून पडतो. वास्तविक कावळा हा पक्षी रॉबिनपक्षाचा नैसर्गिक शत्रू नव्हे आणि मादी तर त्याची नैसर्गिक सहचरीच.

नुकतीच जन्मलेली पक्ष्याची पिले पक्षिण जवळ येताच चाऱ्यासाठी तोंड पसरतात. आणि पक्षिण त्या पसरलेल्या तोंडात चारा भरवते. येथे उघडे तोंड हा चेतक आणि चारा सारण्याची क्रिया हा प्रतिसाद असतो.

एकही वीत न झालेली उंदरीण, तिला जर प्रॉलॅक्टिनच्या हर्मोनचे इंजेक्शन देण्यात आले तर, पिलकरी उंदरिणीप्रमाणे बिळ वगैरे तयार करण्याच्या कामास लागते.

प्राण्यांच्या उपजत वर्तनांची अशी शेकडो उदाहरणें निसर्गसृष्टीतून काढून दाखविता येतील. ही वर्तने इतकी योजनाबद्ध असतात की मुद्दाम आखूनही इतकी व्यवस्थित ती घडवून आणता येणार नाहीत. अंडी उबविण्याच्या यंत्रातून बाहेर आलेली पक्ष्याची पिल्ले ज्या तक्तपोशीवर ठेवलेली असतील ती तक्तपोशी जितक्या वेळा थरथरेल तितक्या वेळा चाऱ्यासाठी चोच पसरतील. याचा अर्थ आईच्या वजनाने होणारी घरट्याची थरथर त्यांच्या डोक्यात भिनलेली आहे. ती प्रत्यक्ष आईला ओळखत नाहीत.

अनेक सस्तन प्राण्याना स्वतःची पिले ओळखता येत नाही. त्यांचा हिशेब करता येत नाही. प्रयोग करणारा त्या माद्यांना जितकी पिले पुरविल तितक्यांचा ती एकत्र हिगारा करतात. एका जातीचे सरडे एकमेकाच्या शेपट्या धरून धावतात. अशा सरड्यांची माळ गरगर वाटोळी फिरवून जर मध्येच तुम्ही सोडून दिली तर थकून खाली पडेस्तवर ते सरडे वर्तुळाकृती फिरत राहातात. उंदरांवर प्रयोग करणाऱ्या एका शास्त्रज्ञाला असे आढळून आले की उंदरीण–आजीबाईनी आपली अनेक नातवंडे खाऊन चट्टा केली होती आणि माता–उंदरिण हा सगळा वंशसंहार निर्विकार नजरेने पाहात होत्या.

रॉबिन पक्ष्याचा कडवा प्रदेशाभिमान, सरड्यांचे थकेस्तवरचे गोलगोल धावणे, उंदरिणीने स्वतःचीच नातवंडे मारून खाणे या उपजत वर्तनांच्या वर्गात मोडतात. कोणे एके काळी त्या जमातीच्या जीवरक्षणाला त्यानी हातभार लावला असेल. पण नंतर त्यांचा तो उपयोग संपुष्टात आला. नव्हे जमातीच्या वंशरक्षणाच्या दृष्टीने धोकेबाजही बनला. पण असे असूनही ती क्रिया टाकावू बनली नाही. थोडक्यात, उपजत–वर्तने जितकी सुबुद्धपणाची असू शकतात तितकीच निर्बुद्धपणाचीही असू शकतात कारण ती यांत्रिक, अनिवार्य व अपरिवर्तनीय असतात.

तीन, उपजत–प्रवृत्तीच्या चेतक व प्रतिसाद या दोन भागांपैकी कधी चेतक अधिक लवचिक असतो तर कधी प्रतिसाद अधिक लवचिक असतो. नर रॉबिन लाल रंग दिसताच प्रतिकारसज्ज होतो. मग तो लाल रंग पक्ष्याचा असो की कागदावरचा. स्टिकलबॅक नावाचा नर मासा फुगीर पोटाचा दुसरा मासा समोर येताच प्रणयाराधनाच्या हालचालींना सुरुवात करतो. मग तो खरोखरचा मासा असो वा माशाचे ते बाहुले असो. येथे प्रवृत्ती रिजिड आहेत. तर पुढील उदाहरणात त्या लवचिक आहेत. पक्षी, उंदीर वगैरे प्राणी वीणकाळात पिलांसाठी घरटी तयार करतात. सामान्यतः घरट्यांसाठी ते काही ठराविक सामान वापरतात.

पण जर हे पारंपरिक सामान मिळाले नाही तर वेगळे साहित्य वापरण्याची त्यांची तयारी असते.

कधी प्रतिसाद आधी ठरला जातो. चेतक मागाहून निश्चित होतो. मात्र चेतक एकदा निश्चित झाला की मागाहून त्यात बदल होत नाही. बँकेत नवीन खाते उघडताना कोणीतरी आपली हमी द्यावी लागते. पण एकदा हमी दिली की पुढे आयुष्यभर ती हमी चालते. तसेच येथे घडते. याला सहजप्रवृत्तींचे छपाईकरण –imprinting असे नाव आहे.

मॅलार्ड डक्लिंग पक्ष्याला उपजत–प्रवृत्तीने स्वतःची जन्मदाती आई ओळखता येत नाही. त्यामुळे जन्मानंतरच्या पहिल्या तेरा ते सोळा तासात जी पहिली हलती वस्तू त्याच्या नजरेसमोर येते त्या वस्तूला ते पिलू आई म्हणून चिकटते. यानंतर त्याचे आयुष्य सरेपर्यंत तीच त्याची आई, प्रेयसी, सहचरी सर्व काही. मग ही चालती वस्तू रबरी फुगा असो, खोका असो वा खुर्ची असो. ( सुदैवाने बहुतेक प्रसंगी पहिल्याने या पिलांची गाठ त्यांच्या आईशीच पडते. ) येथे प्रतिसाद प्रथमपासून असतो. चेतक मागाहून ठरतो. पण एकदा तो ठरला की ठरला. मागाहून त्यात बदल घडत नाही.

या सर्व निरिक्षणावरून असा निष्कर्ष काढता येतो की सहजप्रवृत्ती जर अशा प्रकारे जीवाच्या पिंडावर जन्मतःच छापल्या जात असतील तर प्राणीमात्राचे बरेचसे आयुष्य पूर्वनिश्चित किंवा पूर्वमार्गदर्शित समजावयास हवे. ते विचारपूर्वक ( Thought out ) नाही. असो.

उपजत वर्तनांच्या बाबतीत आता फक्त एक गोष्ट सिद्ध करायची राहिली. ती ही की ही उपजत–वर्तने प्रतिमा–पंक्तीत आपल्या मनाच्या ठिकाणी वास्तव्य करून असतात. कसे ते पाहा. आपण ज्या शारिरीक हालचाली करतो त्या हालचालींना समांतर अशा हालचाली त्याच वेळी किंवा त्याच्या निमिषमात्र आधी आपल्या मनात वा मेंदूत घडत असल्या पाहिजेत. जर तसे घडत नसते तर या प्रसंगी आपण काय प्रतिक्रिया करावी याची पूर्वसूचना नसल्याने वाटेल प्रतिक्रिया आपणाकडून घडली असती. पण तसे न घडता आपणाकडून योजनाबद्ध हालचाली घडताना दिसतात. योजनाबद्ध हालचाली घडतात याचाच अर्थ हालचाली कोठल्या असाव्यात याची सूक्ष्म सूचना आपल्या मनाला कोठून तरी मिळत असावी. ही सूचना अर्थात शाब्दिक असणे शक्य नाही हे आपण तावडतोब कबूल करू.जर ती शाब्दिक नाही तर ती चित्रपंक्तीत असावी हा अपरिहार्य निष्कर्ष आहे. प्रयोगांती याला पुरावा गवसतो. नवजात अर्भकाच्या चेहऱ्याजवळ जर तुम्ही आपला चेहरा नेला तर ते मूल हासून प्रतिसाद देते. येथे अर्थात ते मूल तुमचा चेहरा ओळखून तो प्रतिसाद देणे शक्य नाही. कारण एवढ्या लहान वयात चेहरा ओळखण्याइतकी त्याच्या



अनुक्रमणिका



बुद्धीची तयारी असू शकत नाही. तेव्हा हासण्याची प्रतिक्रिया ही प्रतिक्षिप्त—Reflexive प्रतिक्रिया आहे. मूल डोळ्यांच्या चेतकाना हासण्याचा प्रतिसाद देते. डोळ्यांचे आणि डोळे दिसताच त्या डोळ्याना द्यावयाच्या प्रतिसादाचा ठोकळ आराखडा आपल्या मेंदूत आहे. डोळे किंवा त्या डोळ्यांचे कागदावरचे चित्र चेहऱ्यानजिक येताच ही चित्रें सजीव होतात नि मूल त्यातील सूचनांबरहुकूम हासण्याचा हावभाव करते. असो. तेव्हा उपजत—प्रवृत्तींच्या प्रकटीकरणाच्या बाबतीत सरडा, रॉबिन आणि मानवी बालक या तिघातही जरादेखिल फरक नसतो. या तिघांच्याही प्रतिक्रिया सारख्याच यंत्रवत् आणि मनोविरहित आहेत.

चेतक—प्रतिसादाच्या साखळीरूपातील अगणित वर्तन—साचे वर आपण पाहिले. जसे हे साचे प्राण्यांच्या ठिकाणी आहेत तसेच ते माणसाच्याही ठिकाणी आहेत. साधा स्त्री—पुरुषातला बातचितीचा प्रसंग घ्या, या प्रसंगातली स्त्री एका विशिष्ट प्रकारचेच अविर्भाव करीत असते आणि पुरुष दुसऱ्या एका विशिष्ट अविर्भावानी तिला प्रतिसाद देत असतो. उदा. स्त्रीच्या आवाजात मार्दव असेल, चेहऱ्यावर काहिशी लज्जा असेल, ती कदाचित पदराशी चाळा करीत असेल, तिची नजर खाली किंवा बाजूला असेल वगैरे. पुरुषाच्या हालचालीही तशाच अर्थपूर्ण असतील. त्याच्या आवाजात व हालचालीत आश्वासकता असेल, नजरेत चांगुलपणा असेल, वगैरे. या दोन्ही प्रकारच्या हालचालीतून एकच आशय दोन उलटसुलट बाजूनी व्यक्त होत असतो. स्त्री स्वतःच्या नाजूकतेचे प्रदर्शन करून पुरुषाच्या संरक्षक—वृत्तीला उत्तेजित करू पाहात असते. तर पुरुष स्वतःच्या संरक्षक—वृत्तीचे प्रदर्शन करून स्त्रीला तिच्या नाजूकतेचे प्रदर्शन करावयास प्रोत्साहन देत असतो. मानवी समाजात अनादी कालापासून स्त्री व पुरुषाकडे परस्परांच्या संबंधात काही विशिष्ट भूमिका परंपरेने चालत आल्या आहेत. स्त्री अबला म्हणून रक्षिता आहे आणि पुरुष शक्तिमान म्हणून रक्षक आहे. गेल्या हजारो वर्षात स्त्री—पुरुषानी रक्षक व रक्षिताचा खेळ खेळला आहे त्याचीच चित्रें आनुवंशिकतेच्या तत्वाने आपल्याही मनावर उमटली आहेत, आणि तसे प्रसंग येताच आपल्या बाह्य हालचालीतून ती व्यक्त होत आहेत. ( अर्थात एखादी स्त्री वरील विभ्रमांचे नाटक करणारच नाही असे म्हणता येत नाही. )

कोणतीही प्रजाती, उत्क्रांतीक्रमाच्या जितकी खालच्या पातळीवर तितकी तिची उपजत—वर्तने अधिक यंत्रवत असतात. जी प्रजाती उत्क्रांतीक्रमाच्या वरच्या पातळीवर असते तिची उपजत—वर्तने जास्त मोकळी असतात. कनिष्ट प्रजातींचे प्राणी ठराविक चेतकाना फक्त ठराविकच प्रतिसाद व्यक्त करू शकतात. उलट माणूस एकाच चेतकाला अनेक प्रतिसाद देऊ शकतो किंवा एका प्रतिसादासाठी अनेक चेतक वापरू शकतो. साप अंगावर धावून आला तर कोणी भीतीने मागे सरेल; कोणी जागच्या जागी थिजून जाईल तर एखादा सापाच्या डोक्यात

घोंडा घालावा म्हणून इकडे तिकडे धोंडा शोधू लागेल. साप एकच. पण तीन वेगवेगळी माणसे तीन वेगवेगळ्या प्रतिक्रिया व्यक्त करतात.

मानवजात वगळता ईतर जातीचे प्राणी त्यांच्या शरिरातील अंतःस्रावाशी बांधलेले आहेत. किंवा बरोबर म्हणजे त्यांची उपजत–वर्तने अंतःस्रावाशी बांधलेली आहेत. कुत्री वा इतर प्राणी वर्षातून फक्त ठराविक काळातच माजावर येतात. माणूस या बाबतीत पूर्णपणे स्वतंत्र आहे. म्हणजेच माणूस केवळ कामग्रंथीशी संलग्न नाही. त्याच्या वासनेचा संबंध त्याच्यातल्या कल्पनाशक्तीशीही आहे.

आपला खरा विषय चित्रकलेचा व त्यात आलेल्या प्रतीकांचा आहे. म्हणून आपल्या समोरील मुख्य प्रश्न आपल्या डोक्यात काय घडते व ते कसे घडते हा आहे. नवजात बालक स्वतःच्या आईकडे पाहून हासते. पण ते तिला ओळखून हासते की तिच्या चेहऱ्यातले काही विशिष्ट घटक ओळखून हासते? दुसऱ्या शब्दात, बालकाचे मन कोऱ्या पाटीगत असते की आधिच काही मजकूर त्याच्यावर लिहून आलेला असतो? शक्यता अशी आहे की अर्भकाचे मन कोरे नसून त्याच्यावर आधीपासूनच काही मजकूर लिहून आलेला असतो. त्याचे हासणे म्हणजे त्याने तो मजकूर ओळखला होता याची पावती असते. क्षणभर अर्भकाच्या मनाचा प्रश्न आपण दूर ठेवू. अर्भकाच्या मनात आपणाला प्रवेश करता येत नाही. आपण आपल्याच मनाचे उदाहरण घेऊ नि त्याचे पृथःकरण करून आपल्या पुढच्या प्रश्नाचे उत्तर शोधू.

अगदी पहिल्याने जेंव्हा एखाद्या अनोळखी तरुण स्त्रीशी बोलण्याचा प्रसंग तुमच्यावर आला तेव्हा तुमच्या मनाची व शरिराचीही स्थिती काय झाली होती ते आठवून पाहा. तुम्ही काहीसे गोंधळून गेला होता. लाजलाही होता. तुमचा स्वर थोडा जड झाला होता. घसा काहीसा कोरडा पडू पाहात होता. कदाचित तुमच्या हाताच्या तळव्याना छेदही सुटला असेल. छातीतील धडधड वाढली असेल. शब्द सुचेनासे झाले असतील. ही सगळी त्या प्रसंगातली तुमची शारिरीक लक्षणे होती. याच प्रसंगिची तुमची मानसिक लक्षणे काय होती? तुमचा बौद्धिक गोंधळ उडाला होता. मन धास्तीग्रस्त झाले होते वगैरे. एक तरुण मुलगी तुमच्या समोर येताच वरील दोन प्रकारच्या प्रतिक्रिया तुमच्या बाबतीत घडल्या. त्या का घडल्या याचा जर विचार तुम्ही केला तर तुम्हाला असे दिसून येईल की ती तरुणी किंवा तिची आकृती सामोरी येताच त्या आकृतीला काही एक साद देण्याचा प्रयत्न तुमचे मन आणि शरीर करू पाहात होते. परंतु कसल्या ना कसल्या कारणाने सहजतेने तो साद बाहेर येऊ शकला नाही. त्याला काही अडथळा झाला. म्हणून वर दिसला तो त्याची मानसिक संभ्रम. स्त्रीच्या आकृतीला पुरुष–आकृतीचा प्राथमिक प्रतिसाद लैंगिक असू शकतो. पण आपला समाज आज सांस्कृतिकदृष्टया इतक्या आद्य–स्तरावर राहिलेला की जेथे स्त्रीच्या

बाबतीत फक्त एवढाच प्रतिसाद शक्य असू शकतो. स्त्रीच्या बाबतीत आज अनेक संकेत निर्माण झाले असल्याने कोठलाही पुरुष प्रथमभेटीत ही आद्य–प्रतिक्रिया व्यक्त करू शकत नाही. उलट जर का अशी प्रतिक्रिया बाहेर येऊ पाहात असेल तर त्याचे मन त्याच्याही नकळत ती दाबून टाकू पाहाते. म्हणून या विशिष्ट प्रसंगी पुरुषाच्या मनाची संभ्रमित अवस्था : नरस्टिकलबॅक फुगीर पोटाच्या स्टिकलबॅक समोर दिसताच संगमोत्सुक बनून तशा हालचाली करू लागतो; आणि लाल कल्ल्यांचा मासा दिसताच संग्रामोत्सुक बनून लढाईचा पवित्रा घेतो. पण लाल कल्ले आणि फुगीरपोट असा दुहेरी लक्षणाचा मासा पाहाताच संभ्रमित होतो.

उपजत–वर्तनांच्या संबंधी आपला दुसरा प्रश्न असा : उपजत–प्रवृत्तीना धरून जेव्हा एखादी हालचाल आपण करतो तेव्हा त्याच वेळी आपल्या मनाच्या पातळीवर हालचाली घडतात काय ? घडत असल्यास आपल्या मनाला त्या कशा प्रतीत होत असतील ? सुखदुःख इत्यादी मनोविकार कसे जाणवतात ते आपण त्या त्या वेळची मनाची स्थिती वर्णन करून सांगू शकू. पण जे अर्थ आपण आपल्या कृतीत आणतो ते अर्थ त्या वेळी मनाला जाणवले तर कसे जाणवत असतील ? असा प्रश्न केला तर त्याचे उत्तर काय ? चेतक आणि त्या चेतकाचा प्रतिसाद यापैकी प्रतिसाद प्रत्यक्ष शारिरीक हालचालीच्या रूपात जाणवतो. मग चेतक कोठल्या रूपात जाणवतो ? शब्दप्रतिमांच्या ? चित्रप्रतिमांच्या ? कसल्या स्वनांच्या वा चिन्हांच्या ? ज्या शास्त्रज्ञानी या संबंधात प्रयोग केले ते असे म्हणतात की चेतक जेव्हा उत्तेजित होतो तेव्हा तो दृक्‌संवेदनांच्या रूपात आपणास जाणवतो किंवा चित्रपंक्तीच्या रूपात जाणवतो. सारांश, आपण कोठलीही शारिरीक हालचाल केली तरी त्या हालचालीचे मानसिक समिकरण नर्व्हस् सिस्टिमवर – मज्जाव्यवस्थेत उमटते. मेंदूतले हे समिकरण जाणिवेला चित्रांच्या रूपात प्रतीत होते. मनातल्या हालचाली मनाला चित्रप्रतिमात जाणवतात हा निष्कर्ष शास्त्रज्ञानी प्राक्कथांच्या विश्लेषणावरून काढला आहे.

प्राक्कथांचा ज्यानी अभ्यास केला आहे ते सर्व लोक ( उदा. क्लॉड लेव्ही-स्ट्रॉस, ब्रानिस्लॉव मालिनोवस्की, मिर्सिआ एलियाद, जोझेफ कॅमबेल, अर्न्स्ट कॅसिरे, नार्थरॉप फ्राय वगैरे ) असे म्हणतात की या प्राक्कथा म्हणजे आदिम मानवाचा केवळ स्वैर कल्पनाविलास नव्हे. त्याना मानवी जीवनात निश्चित प्रयोजन आहे. आदिम मानवाने त्याच्या आत त्याला जे अस्वस्थ करीत होते ते व्यक्त करण्यासाठी ज्या कथा रचल्या त्या म्हणजे या प्राक्कथा. माणूस त्याच्या जन्मापासूनच दोन वेगवेगळ्या जगात वावरत आला आहे. खरे तर तीन जगात. पण प्रथम आपण त्याची दोनच जगे पाहू. यातील एक जग बाह्य–सृष्टीचे, इतर माणसांचे, वस्तुमात्रांचे. आणि दुसरे जग त्याच्या आतील मनोविकारांचे, मानसिक हाल-

चालींचे. बाह्य जग जर त्याला त्याच्या मनाप्रमाणे वळविता येत नसेल, म्हणजेच बाह्य जग जर त्याच्यासाठी काही मानसिक प्रश्न तयार करीत असेल तर हे प्रश्न तो आतल्या जगाच्या पातळीवर सोडवू पाहातो. कारण माणूस हा संकेतचिन्हांच्या साहाय्याने जगणारा प्राणी आहे. त्याच्या जीवनाचे सगळे प्रश्न या त्याच्या वैशिष्ठ्यातून तयार होतात. कारण या वैशिष्ठ्यामुळे तो जसा जड वास्तवाच्या जगात राहातो तशाच प्रकारे भावी शक्यतांच्या, आदर्शांच्या जगातही राहातो. शक्यतांचे जग त्याला स्वातंत्र्याची मीती वहाल करते. तर बाह्य जग त्याच्यासाठी जे मानसिक प्रश्न निर्माण करते त्याची सोडवणूक माणूस त्याच्या मनाच्या पातळीवर करू पाहातो. आणि हे अगदी प्रत्येक मूल स्वतःच्या जन्मापासून करीत असते. कारण माणूस म्हणजे माणसाचा बाहेरच्या जगाबरोबरचा संबंध. हा संबंध प्रारंभी तरी दुसऱ्या जिवंत व्यक्तीशी असतो. प्रत्येक मुलाचा पहिला असा संबंध त्याच्या आईशी येतो. प्रत्येकाच्या आयुष्यातली पहिली बाह्यवस्तू म्हणजे त्याची स्वतःची आई. ही आई त्याला जसे हाताळते तसे तो आयुष्याबरोबरचे संबंध शिकतो. आयुष्यात पुढे कशा प्रकारे वागायचे याचे नमुने शिकतो. पण कोठलिही आई कितीही समजूतदार असली तरी मूल अर्भकावस्थेत असताना आपल्या मुलाच्या एकूण एक गरजा जाणूच शकत नाही. कोठल्याही दृष्टचा ते तिला अशक्य आहे. म्हणून मुलाच्या वाढवण्यात काही उणीवा स्वाभाविकपणेच राहून जातात. या उणीवानी मूल त्रस्त होते. संतापते. पण त्याला प्रत्यक्ष काही करता येत नाही. नव्हे, आपण संतापलो आहोत हेही त्याला समजत नाही. त्याच्यापाशी अद्याप शब्द तयार झालेले नाहीत. म्हणून कल्पनाही आलेल्या नाहीत. त्याचा संताप ही शारिरीक प्रतिक्रिया आहे. हा प्रश्न मग ते मानसिक पातळीवर सोडवू पाहाते. त्याने त्याच्या आईची आकृती मनाने आत्मसात केलेलीच असते. या आकृतीच्या संदर्भात ते तो संताप सोडवू पाहाते. अर्थात हे सर्व अत्यंत अबोध पातळीवर घडत असते. मुलाच्या आणि मोठयांच्याही मनाच्या अत्यंत अबोध पातळीवर नाना प्रकारचा कल्पनाविलास त्यांच्या स्वतःच्याही नकळत चालू असतो. त्या कल्पनाविलासातून मुलाच्या भावी वागण्याचे साचे तयार होतात. असो. तर हा कल्पनाविलास किंवा मनाच्या हालचालीना दिले गेलेले शाब्दिक रूप म्हणजे आदिम प्राक्कथा. या प्राक्कथा आदिम मानवाच्या जीवनातले अडचणींचे टप्पे आणि त्या टप्प्यावर त्याने केलेली मात यांचे वर्णन देतात. मात करणारा तो त्यांचा हिरो. एका अर्थी या सगळ्या प्राक्कथा म्हणजे Creation myths निर्मिती कथा होत. रामाने फार फार प्राचीन काळी अमका पराक्रम केला. राम तो पराक्रम करू शकतो म्हणून आम्हीही तो करू शकू. आमच्या अमक्या आदि-नायकाने या प्रकारे शहर वसवले. आम्हीही ते करू शकतो. Creation म्हणून शेवटी Self-Creation. आत्मनिर्मिती. प्रत्येक हिरो एकामागोमाग एक असे

अनेक पराक्रम करीत असतो. नि ते पराक्रम करताना जणू स्वतःलाच निर्माण करीत असतो. स्वतःच स्वतःला निर्माण करण्याची ही कल्पना येथे फार महत्त्वाची आहे. फक्त माणूसच स्वतःच स्वतःला निर्माण करू शकतो. नव्हे, तीच त्याची अटळ नियती असू शकते. तसे न करणे म्हणजे नियतीची त्याने केलेली वंचना होय.

मानवी आयुष्याची एकूण संरचनाच अशी आहे की ते जर खऱ्या अर्थाने जगले जावयाचे असेल तर आयुष्यातल्या प्रत्येक नव्या टप्प्यावर तो टप्पा ओलांडून त्याला पुढे जाणेच भाग आहे. प्रत्येक नव्या टप्प्यावरची नवी ओळख, नवी आयडेंटिटी आत्मसात करीतच ते जगले गेले पाहिजे. प्रौढत्व, उत्तरोत्तर होत जाणारा व्यक्तित्वाचा विकास हाच जीवनाचा एकमेव कायदा असू शकतो. ही वाढ शारिरीक पातळीवरची आहे तशीच मानसिक भावनिक पातळीवरचीही आहे. मानवी जीवनाच्या रचनेत स्थिती आणि गती या दोन्ही घटना अंतर्भूत आहेत. माणूस हा देह आहे. म्हणून एका निश्चित भूतकाळाने तो जीवनाला प्रारंभ करतो. पण त्याला भविष्य आहे. कारण मृत्यू त्याचा देह घेऊन जाईपर्यंत हा देह जगणार आहे, त्याच्या बाबतीत नवनव्या घटना घडणार आहेत म्हणून त्याला 'काल'बरोबरच 'आज' नि 'उद्याही' आहे. उद्या म्हणजेच शक्यतांची मालिका, कारण उद्या आज ठरून राहिलेला नाही. उद्या हा शक्यतांचा प्रांत असतो. हे स्वातंत्र्य मर्यादित आहे. कारण शक्यता मर्यादित असतात. पण माणसाच्या जगण्याचा मूळ ठसा स्वतंत्र्याचा आहे. हे स्वातंत्र्य तो कसे आत्मसात करतो यावर त्याच्या वाढीची कल्पना ठरणार असते.

या वाढीचे टप्पे अनेक असतील. कोणी ते चार मानील. आपण हिंदू लोक मानतो त्याप्रमाणे-ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ नि संन्यास. किंवा सोळा संस्कार घ्या. हे मुद्दा आयुष्याच्या मार्गावरचे टप्पेच आहेत. म्हणून कोणी टप्पे चार मानील, कोणी आठ मानील किंवा कोणी सोळा वा अधिक मानील. कोण किती टप्पे मानतो याला येथे महत्व नाही. महत्व आहे ते या प्रत्येक टप्प्यावर एक एक ठाम भूमिका घ्यावी लागणार असते याला. या भूमिकेत मागील भूमिकेचा काही अंश गाळला जातो तर काही पुढच्या भूमिकेतून घेतला जातो. जन्मल्यापासून जीवनाने काही एक गती धारण केलेली असते. जीवन अशा प्रकारे जीवनाशय गोळा करीत चालत असते. काही काळाने जीवनाचा नवा टप्पा येतो. आता आजवरचा जीवनसंबंधीचा बराचसा दृष्टीकोन टाकाऊ बनलेला असतो. म्हणून तो टाकून नवीन दृष्टीकोन धारण करण्याची वेळ आता आलेली असते. म्हणजे सरावाच्या जीवनाबरोबर आता फारकत होणार आहे. कधी एके काळी मूल आईच्याच जणू मनाचा नि शरीराचा अविभाज्य भाग होते. कालांतराने त्याला स्वतःच्या नि आईच्या वेगळेपणाचे भान आले. मनाची तेव्हा केवढी उलघाल झाली ! केवढी भांबावलेली अस्वस्थता ! प्रत्येक नव्या टप्प्यावर पुन्हा एकदा हेच आद्य नाट्य वठविले

जाणार असते. फारकत, जुन्या आयुष्यक्रमाचा अस्त आणि नव्याचा उदय ( किंवा सेपरेशन, डेथ नि रिवर्थ ) असा हा क्रम असतो. पण प्रौढत्व हवे, नवी, वयाला साजेशी आयडेंटिटी हवी तर हे दुःख सहन केलेच पाहिजे. तरच त्या आयुष्याचो नियती पुरी होऊ शकेल. नव्या टप्प्याची वेळ आली की जुन्या गतीने चाललेली जीवनऊर्जा खंडित करावी लागते. तिचा मार्ग नव्या दिशेने वळवावा लागतो. नपेक्षा ती जागच्या जागी घुमत राहिल. तिचे डवके वनेल. हे घडताना प्रस्थापित आयडेंटिटींची काही मोडतोड होते. तीत काही नवा भाग येतो. निदान नवी दिशा तरी. या सर्व घडामोडी माणसाला निरनिराळ्या प्रतिमात जाणवतात. त्याना दिले गेलेले शब्दरूप म्हणजे प्राक्कथा. प्राक्कथांचे तपशिल स्थलकालपरत्वे बदलतात. पण मूळ मानसिक समस्या नि समस्यांचे उकल तेच राहातात : सेपरेशन-डेथ-रिवर्थ.

फ्रॉईड यानी यापैकी इडिपस–प्राक्कथेचा विचार केला. म्हणजेच मानवी आयुष्यक्रमातल्या पहिल्या अर्ध्या कालखंडाचा विचार केला. मानवी बालक जगाशी संबंध मातेबरोबरच्या संबंधातून, तिच्या मध्यस्थीने जमवीत असते. म्हणून माता ही त्याच्या आयुष्यातली पहिली प्रियवस्तू. तिच्याशी समरस झाल्याने त्याला जे संरक्षण हवे असते त्या संरक्षणाची भावना मिळालेली असते. पण म्हणूनच त्याला तो कोष सोडावासा वाटत नाही. पण हा कोष सोडल्यावाचून पुढील प्रगती नाही. म्हणून माता किंवा मातेच्या कुशीच्या वोधचिन्हातून सूचित होणाऱ्या सगळ्या अवस्था – कुटुंब, नोकरीचे स्थान, राजकिय पक्ष या त्याच्या आत्म-विकासाच्या मार्गावरच्या अडचणी होतात. या दूर केल्यावाचून तो नव्या टप्प्यावर जाऊ शकत नाही. याच्या उलट युंग यानी नंतरच्या अर्ध्या आयुष्याचा व त्याच्याशी निगडीत असणाऱ्या प्राक्कथांचा नि प्रतिकांचा विचार केला आहे. मातेच्या कुशीतून माणूस बाहेर पडला. त्याने समाजात स्वतंत्र स्थान मिळविले की तो त्या टप्प्यावर अडकून पडू शकतो. या टप्प्याचे वोधचिन्ह लिंग आहे. लिंग म्हणजे कर्तृत्व. विषयोपभोग, धनदौलत, सार्वजनिक प्रतिष्ठा इ. अनेक गोष्टी लिंगाच्या वोधचिन्हात मोडतील. पहिल्या टप्प्यात माणूस वाजवीपेक्षा जास्त पॅसिव्ह, जास्त परावलंबी, निष्क्रिय बनल्याने समस्या निर्माण झाली. दुसऱ्या टप्प्यात तो जास्त ॲक्टिव्ह, जास्त क्रियाशील राहिल्याने ती निर्माण होते. कारण वाजवीपेक्षा फाजिल धडपडीमुळे यानंतर लवकरच कधी तरी या जगाचा निरोप आपणाला घ्यावा लागणार आहे तेव्हा त्या दृष्टीने मनाची तयारी झाली पाहिजे हे सत्य माणूस विसरतो. मानसशास्त्राच्या भाषेत आता माणसाची सगळी जीवनशक्ती लौकिक कर्तबगारीच्या टप्प्यात अडकून राहू पाहते. तेथून तिची सुटका झाल्यावाचून तो पुढील मार्ग पत्करणार नाही. म्हणजे जीवनाच्या प्रत्येक टप्प्यावर त्या त्या टप्प्याला साजेशी निग्रही भूमिका माणसाने घ्यायची आहे. ही



अनुक्रमणिका

भूमिका घेताना भूतकाळ त्याने स्मरणात ठेवून आणि नवीन जीवनातले प्रयोजन निश्चित करून पाऊल उचलायचे आहे. जो राजपुत्र भविष्याचे स्मरण गमावतो तो जादूगाराच्या मंत्राने शिळा होऊन पडतो. आणि जो भूतकाळाचे स्मरण न ठेवता एकदम पुढे घुसतो तो पोपट बनून सगळा भूतकाळ गमावितो. केवळ काल्पनिकात रममाण होऊन राहतो. खरा हिरो भूत आणि भविष्य यांची योग्य सांगड घालतो. निर्धारपूर्वक खंबीर भूमिका घेतो. त्यालाच मंतरलेले पाणी, अप्राप्य फल नि सोनेरी केसाची सुंदर राजकन्या प्राप्त होतात.

जगभरच्या प्रावकथांचे सूक्ष्म पृथक्करण करून युंग यानी मनाच्या संरचनेसंबंधी आपली कल्पना मांडली आहे. युंग म्हणतात की मानवी मन अगणित प्रकारच्या छोटया छोटया चित्रठशांचे बनले आहे. हे चित्रठसे मानवी मनाला पडणाऱ्या सनातन प्रश्नांशी निगडीत असतात. हे चित्रठसे चेतक आणि त्या चेतकाना द्यावयाचा मानसिक-शारिरीक संभाव्य प्रतिसाद यांच्या स्वरूपात असतात. या जातींचे अगणित चित्रठसे आमच्या मनाच्या ठिकाणी आहेत.

मेंदूच्या ठिकाणी काही खळवळ झाली की ती खळवळ आपल्या मेंदूला चित्ररूपात जाणवते असे आताच आपण म्हटले. ते कसे घडते व का घडते ते आता पाहू. एखादी सुंदर मुलगी तुमच्या समोर आली की सूक्ष्म का होईना पण तुमची कामवासना चाळवते. एखादी वृद्ध व्यक्ती आली की तुमच्या मनात आदराची भावना उत्पन्न होते. कोणी न शिकविताही हे घडते. कारण हे असे करावे अशा प्रकारच्या मानसिक पूर्वसूचना तुमच्या मनाच्या ठिकाणी प्रथमपासूनच अस्तित्वात असतात आणि तो विशिष्ट प्रसंग उत्पन्न होताच त्या त्या हालचाली बाहेर येतात. या सर्व हालचाली म्हणजे तुमच्या मनाच्या आतील त्या त्या वस्तूना ( ऑब्जेक्ट्स्ना ) तुम्ही दिलेले प्रतिसाद होत. हे प्रतिसाद म्हणजे त्या त्या आकृति वा वस्तूंची जी चित्रे तुमच्या मनात आहेत त्या चित्रांशी तुम्ही कसे वागावे याचे अबोध मार्गदर्शनच होय. तुम्ही म्हणाल की लहानपणापासून स्त्री हा प्राणी तुम्ही पाहात आहात म्हणून तुम्ही तसे वागला. पण यातील फक्त पहिलाच भाग काही प्रमाणात खरा आहे. तुम्ही स्त्रीची आकृती जरी लहानपणापासून पाहात असला तरी कामवाचक जी प्रतिक्रिया तुमच्या मनात निर्माण झाली ती तुम्ही पाहिली नव्हती. आणि शिकलाही नव्हता. ही प्रतिक्रिया उत्स्फूर्त होती. म्हणजेच तुमच्या मनाला व शरिराला आधीपासून माहित असलेले असतात. आणि तो प्रसंग उद्भवताच तुम्ही ते व्यक्त केले.

युंगप्रणीत मानसशास्त्राच्या भाषेत या सर्व घडामोडीचा अर्थ असा की दोन वेगवेगळ्या मार्गांनी स्त्री व वृद्धाचे चित्र तुम्ही तुमच्या मनात साठविले होते. आणि वेळ येताच त्या त्या चित्रांशी सुसंगत असे वर्तन तुम्ही केले. या दोनदोन चित्रांपैकी एक चित्र तुमच्या स्वानुभवातून व दुसरे तुमच्या पूर्वजांनी जे



अनुक्रमणिका



एतद्‌विषयक अनुभव घेतलेले असतात त्यातून तयार झाले होते. कोठलिही आकृती आपल्या समोर आली की तिला पाहाताच आपल्या मनाच्या ठिकाणी काही हालचाल घडते आणि मग ती आकृती ओळखून तिच्याशी सुसंगत वर्तन आपण करतो. मनाच्या आत असणारे हे आकार चित्रप्रतिमांच्या रूपात आहेत. व तसे असल्यामुळेच आपण बाह्य आकाराशी त्यांची तुलना करून त्याप्रमाणे वागतो बाहेर जसे अवकाश आहे तशाच प्रकारचे एक वेगळे अवकाश मनाच्या ठिकाणी आहे असे जर आपण म्हटले तर हे सर्व आकार त्या मानसिक अवकाशात राहातात असे आपणास म्हणता येईल. या आकारांपैकी आद्य म्हणजे आनुवंशिक सामूहिक आकाराना किंवा चित्राना युंग आर्किटाइप–मूलठसे–म्हणतात. मूलठसे म्हणजे कोठल्या प्रसंगी कोठले वर्तन करावे याची सूचना देणारे सूक्ष्म मानसिक आराखडे.

आर्किटाइप्स अनेक आहेत. त्यातच एक स्त्रीचा आर्किटाइप आहे. स्त्रीचा आर्किटाइप म्हणजे स्त्रीविषयक सर्व होकारात्मक आणि नकारात्मक अनुभव-क्रमांचा अर्क.–स्त्रीत्वाचे सार. 'ती स्त्री माझा नेमका टाइप होय' असे शब्द काही वेळा आपण ऐकतो, यातील टाइप म्हणजेच आपला आर्किटाइप. हा अर्क किंवा अर्कांचा साचा आपल्या छोटया व मोठया मेंदूत (सबकॉर्टेक्स व कॉर्टेक्स) चयांच्या रूपात असतो. या चयांशी अधिकात अधिक जुळणाऱ्या स्त्रीला ती माझा 'टाइप' असे आपण म्हणू.

आपल्या मेंदूत किंवा मज्जाव्यवस्थेत असे अगणित मूलठसे घर करून असतात. हे ठसे जन्मिक असतात. म्हणजेच जन्मतःच ते आपल्या ठिकाणी येतात. हे ठसे किती आहेत त्याचा नेमका आकडा आपणाला सांगता येणारच नाही असे नाही. पण ती गोष्ट वरीच कठीण पडेल एवढे खरे. मूलठशांचा एकूण आवाका ज्या त्या संस्कृतीच्या व समाजाच्या विशिष्ट जीवनरहाटीवर ठरत असतो. प्रत्येक संस्कृतीत तेथल्या माणसांच्या काही विशिष्ट भूमिका प्रातिनिधिक असतात. तर इतर कित्येक भूमिका सर्वसामान्य, नेहमी नजरेस पडणाऱ्या असतात. उदा. राजा किंवा नेता ही भूमिका प्रातिनिधिक आहे. तर शिपाई, रखवालदार, शिक्षक, इत्यादि कित्येक सर्वसाधारण भूमिका आहेत. पिढ्यानपिढ्या मानवजात या भूमिकांचा अनुभव घेत आली आहे. या अनुभवातून जात आली आहे. मानवजात या भूमिकांचा अनुभव घेत आली आहे याचाच अर्थ यातील भूमिका समोर आली असता तिला कायकाय प्रतिक्रिया दाखवायच्या हे शिकत आली आहे. पिढ्यानपिढ्या त्याच त्याच चेतक-प्रतिसादाच्या साखळीतून गेल्याने या चेतक-प्रतिसादांचे सर्वसाधारण ढोबळ चित्र माणसाच्या मनात तयार झाले आहे. मूलठसे सर्वच जीवनप्रसंगांसाठी तयार होत नाहीत. किंवा सर्वच सार्वजनिक रोल्स किंवा भूमिकांचेही तयार होत नाहीत. लोकसमूहाच्या सामुदायिक जीवनात ज्या भूमिकाना महत्त्व असेल त्याच भूमिकांचे तेवढे



अनुक्रमणिका



मूलठसे तयार होतात. जेथे जेथें मूलठसा असतो तेथें तेथे स्वाभाविक प्रेरणांचा संबंध येतो. मूलठश्याशी संबंधित प्रतिक्रिया अतिशय स्वाभाविक असतात. अर्थात एखादा सामाजिक पेशा मूलप्रेरणेचा भाग आहे की नाही हे ठरविता येणे तितकेसे सोपे नसते. आजच्या आपल्या समाजात पोलिसमन, पोष्टमन, आणि बसकंडक्टर अशी तीन व्यक्ती सर्वत्र दृष्टीस पडतात. यापैकी फक्त पोलिसमनसाठी मूलठसा असला तर असेल. कारण दुसरे दोन पेशे आपल्या समाजात अगदी अलिकडे आले आहेत. त्यामुळे त्यांच्याबद्दलच्या क्रियाप्रतिक्रिया अद्याप तयार व्हायच्या आहेत. पोलिसची गोष्ट यापेक्षा वेगळी आहे. पोलीस किंवा त्याचा पर्याय आपणाला अगदी प्राचीन कालापासून परिचित आहे. माणसे सोडाच पण माकडात देखिल पोलिस किंवा रखवालदाराचा उपयोग केल्याचे आढळते. माकडेसुद्धा समूहाने खाणेपिणे करताना अथवा विश्रांती घेताना आपणापैको एकादोघाना पहाऱ्यावर बसवितात. प्राचीन काळातल्या पहारेकऱ्याचा नवा अवतार म्हणजे आपला पोलिस. पोलिसाच्या भूमिकेशी नि आकृतीशी आपला अशा प्रकारे दीर्घ परिचय आहे, म्हणून तिच्यासंबंधिच्या क्रियाप्रतिक्रियात्मक मानसिक सूचनाही आपल्या ठिकाणी आहेत.

पोलिसाच्या आकृतीशी आपल्या मेंदूचा नि मनाचा परिचय आहे. या आकृतीशी कसे वागायचे, कोठल्या शारिरीक–मानसिक प्रतिक्रिया व्यक्त करायच्या ही गोष्ट आपले शरिर आणि मन जाणते. आपण जेव्हा प्रत्यक्ष पोलिसाला पाहातो तेव्हा आपल्या डोक्यातला मूळ अस्पष्ट ठसा अधिक ठळक बनतो. सारांश, ज्या सामाजिक भूमिका प्रजातीविशिष्ट, उत्क्रांतीवाचक नि स्थलकालविशिष्ट आनुवंशिक प्रेरणांचे मूळ असते त्यांचेच फक्त आर्किटाइप्स असतात. तसेच ज्या आकृत्या गेली हजारो वर्षे आपण पाहात आलो आहोत त्यांचेही आर्किटाइप्स असतात. उदा. चंद्र, सूर्य, डोंगर, नदी वगैरे.

मूलठसे किंवा जन्मचित्रे अगणित आहेत. पोलिसाचा ठसा हा त्यातला एक. पोलिसाप्रमाणेच राजा, राणी, तरुण शिलेदार, परी, चेटकी, चेटक्या, जादूगार, फकिर, वनदेवी, बाल्वीर, तरुण रुपवती, राक्षस, सैतान, साधू खूपच तयार ठसे आहेत. या प्रकारची मानसचित्रे आपल्या डोक्यात आहेत याचा एक पुरावा हा की जगभरच्या सगळ्या आर्ष वाङ्मयात त्यांचे किंवा त्यांच्या पर्यायांचें वर्णन आढळते. जर ही चित्रे माणसाच्या मनाच्या ठिकाणी नसती तर त्यांच्यावर आधारित समान कल्पनाबंध सांगणाऱ्या कथा दूरदूरच्या ठिकाणी तयार झाल्या नसत्या. हेच कल्पनाबंध आजच्याही वाङ्मयात आढळतात. रूपात थोडा बदल करून. प्राचीन वाङ्मयातला दुर्जनांचा वैरी नि सज्जनांचा कैवारी तरुण रजपूत शिलेदार, नव्या वाङ्मयात दुर्जनांशी एकट्याने मुकाबला करू पाहाणारा नरवीर सरदार किंवा गनमन बनतो. दुष्ट सत्ता विरुद्ध गुप्त शक्ती, दैत्य विरुद्ध देव,

राक्षस वा चेटक्या विरुद्ध धाकटा राजपुत्र हाच कल्पनाबंध फिरूनफिरून जगभरच्या वाङ्मयात नि कलाविष्कारात परावर्तित होताना दिसतो. देशकाल–परिस्थितीनुरूप त्यांच्या बाह्य तपशिलात काय फेरबदल होतील ते ! बाकी मूळ गाभा सर्व ठिकाणी तोच ! कृष्ण जन्मतःच बापाचे घर सोडतो. कर्णाला पेटाऱ्यातून नदीच्या पाण्यात सोडण्यात येते. मोझेस पेटाऱ्याऐवजी गवती टोपलीतून पाण्यात सोडला जातो. शेवटी हे सर्वजण आयुष्याचे वर्तुळ पुरे करून मूळ ठिकाणी येतात. पण व्यक्तित्वाने पूर्णतः प्रौढ बनून. असे आहेत हे मूलठसे. संख्येने अगणित. शारिरीक पूर्वप्रवृत्तींची बौद्धिक समीकरणे म्हणजे हे मूलठसे.

मनाच्या ठिकाणच्या आंगिक मूलठशांची कल्पना प्रथम युंग यानी सूचित केली. आर्किटाइप हा शब्दसुद्धा त्यांचाच. जगभरचे नाना लोक, त्यांचा तितक्याच नाना चालिरीती, कथाकल्पना, दंतकथा, धार्मिक रूढी, श्रद्धा आणि अश्रद्धा, विश्वास आणि अविश्वास, चित्रे, शिल्पे, त्याना पडणारी स्वप्ने, भीतीस्वप्ने, त्यांची तत्त्वज्ञाने, पंथोपपंथ इत्यादींचा तौलनिक अभ्यास करून त्यानी हा निष्कर्ष काढला. युंग म्हणतात की जगाच्या पाठीवरचे कोठलेही लोक घेतले तरी त्यांच्या कला व वाङ्मयीन आविष्कारात ठराविक मोटिफ्स किंवा कल्पनाबंध निश्चितपणे आढळतात. म्हणून सर्व मानवी मने तळाशी सामूहिक आहेत. किंवा त्यांचे रचनाघटक समान आहेत. दुर्दैवाने युंग यांचा सामूहिक हा शब्द बौद्धिक गैरसमजाना जन्म देणारा ठरला. युंग याना म्हणायचे होते की तळचे मनोघटक सर्व मानवी मनाना समान आहेत. अनेकानी अर्थ काढला की तळाशी सर्व मानवी मने एकजीव आहेत. आपणा सर्वांच्या हातापायांची अंतर्गत अस्थिरचना सारखी आहे, ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन कोणी जर असे म्हणाला की आपणा सर्वांचे हात आणि पाय सामूहिक आहेत तर शास्त्रदृष्ट्या ते जितके बरोबर किंवा चूक आहे तितकेच युंग यांचे सामूहिक मनाचे विधान बरोबर वा चूक आहे. मानवी अबोध मन तळाशी सामूहिक आहे याचा अर्थ ते तळाशी प्रजातीविशिष्ट, (मानवजातविशिष्ट) जन्म आणि वंशप्राप्य आहे. ( species-specific, genetic and inherited )

आर्किटाइप्स म्हणजे वर्तनासंबंधीचे शारिर–मानसिक सूचना–फलक. पूर्वप्रवृत्ती. कोठल्या प्रसंगी कोठली शारिरीक–मानसिक हालचाल आपणाकडून घडावी याचे मार्गदर्शन या पूर्वप्रवृत्ती करतात. पूर्वप्रवृत्तींचा वा सूचना–फलकांचा एक कच्चा आराखडाच शारिरीक आंतररचनेच्या स्वरूपात ( फिजिऑलॉजिकल इन्फ्रास्ट्रक्चर ) आपण स्वतःमध्ये वागवितो. हा आराखडा मज्जाव्यवस्थेच्या ठिकाणी आहे. मेंदूच्या ठिकाणचे चरे हे त्याचे शारिरीक रूप म्हटले तर त्या चऱ्याना समांतर असणारे चित्रसमूह हे त्याचे मानसिक–मेंटल–रूप आहे. चित्रसमूहांच्या रूपातले हे मानसिक भाग म्हणजे आर्किटाइप्स. हे आर्किटाइप्स



अनुक्रमणिका

idealized स्वरूपात असतात. म्हणजे आदर्श स्वरूपात असतात. समजा, आईचा आर्किटाइप नमुन्यासाठी निवडला तर तो या वा त्या प्रत्यक्ष आईचा असणार नाही. तो आई या आदर्श संस्थेचा असेल. वस्तुतः प्रत्येक मनात आईची दोनदोन चित्रे असतील. एक प्रत्यक्ष जन्मदात्या आईचे. आणि दुसरे वर उल्लेखिले ते आनुवंशिकतेने मानवजातीच्या मातृविषयक अनुभवातून आपणापर्यंत आलेले. तीच गोष्ट पित्याच्या व इतरही अनेक चित्रांची. अबोध वा असंज्ञ मने दोन आहेत. एक वैयक्तिक अबोध मन. आणि दुसरे सार्वत्रिक किंवा अवैयक्तिक व सामूहिक अबोध मन. म्हणून प्रत्येक जन्मदात्या आईच्या चित्रामागे आणखी एक जगन्मातेचे चित्र असेल. आणि पित्याच्या चित्रामागे जगत्पित्याचे.

आर्किटाईप्स म्हणजे मनोसूचनांचे फलक. या फलकांचे दुसरे टोक शारिरीक प्रतिक्रिया. सूचना–फलकातल्या सुप्त सूचना आणि प्रत्यक्ष शारिरीक प्रतिक्रिया यात जास्तीत जास्त एकरूपता असते. किंवा हे दोन्ही भाग परस्परांना जास्तीत-जास्त पूरक असतात. माझा 'जास्तीतजास्त' हा शब्द तारतम्याने घ्यावयाचा. कारण आर्किटाइप्स हे पातळ रंध्यागत असतात. ते कधीही रिजिड किंवा टणक नसतात. आणि बाहेरील जगातल्या बदलांचा परिणाम सतत त्यांच्यावर होतो. पोलिसाचा आर्किटाइप कायम असेल–उदा. रखवालदार, पहारेकरी, इत्यादी. पण त्या आकृतीच्या बाह्य तपशिलात स्थलकालपरत्वे बदल होतील. पूर्वी भिल्ल किंवा किरात पहारेकऱ्याचे काम करीत. आज गणवेशधारी हवालदार ते काम करतो.

आर्किटाइप्स आणि बाह्य वास्तव या दोघांचे संबंध वादप्रतिवादात्मक आहेत. म्हणजे मनाच्या आत असणाऱ्या आर्किटाइपांचा परिणाम माणसाच्या कृतीतून बाहेरच्या वास्तवावर घडतो. उलट बाहेरच्या वास्तवात जे फेरबदल घडून येतात त्यांचा परिणाम होऊन आतल्या आर्किटाइपांच्या प्रकृतीत फेरबदल घडून येतो. आर्किटाइपाला अशा प्रकारे दोन टोके आहेत. एक टोक आतून बाहेर येऊ पाहणाऱ्या चेतकाचे. दुसरे त्या चेतकाला दिल्या जावयाच्या प्रतिसादाचे. आर्किटाइपाच्या कार्यपद्धतीचे एक प्रत्यक्ष उदाहरणच आपण घेऊ. समजा, राजा किंवा लोकनेत्याचा आर्किटाइप आपणासमोर उलगडत आहे. लोकनेत्याच्या आर्किटाइपाचे दुसरे टोक अनुयायित्वाचे, लोकनेता चेतक म्हटल्यास अनुयायी हा त्या चेतकाचा प्रतिसाद आहे. नेता नसला तर अनुयायी या शब्दाला काही अर्थ नाही. तीच गोष्ट अनुयायी याही शब्दाची. अनुयायांवाचून नेता ही कल्पना फोल आहे. आता हा आर्किटाइप कसा काम करीत ते पाहू. समजा, एका मोठ्या जनसमूहाने कोणा एका व्यक्तीला आपला नेता मानले. आता त्या लोकसमूहाचे त्या व्यक्तीच्या संबंधातले वर्तन अनुयायांचे पारंपरिक नेत्याच्या संबंधातले असावे तसे असेल. ते त्याच्यापुढे मुलांनी त्यांच्या वडिलांसमोर वागावे तसे

नम्रतेने वागतील. त्याचा प्रत्येक शब्द झेलावयास ते उत्सुकता दाखवितील. त्याची एकही आज्ञा ते फुकट जाऊ देणार नाहीत. त्याच्या मानासाठी भांडावयास तयार असतील. थोडक्यात, परंपरेने अनुयायानी नेत्यासमोर जसे वागायचे आहे तसे ते वागतील. याच्या उलट तो नेताही नेत्यानी अनुयायांशी जसे वागायचे असते तसे वागू लागेल. त्याच्या स्वरात खास आत्मविश्वास असेल. नजरेत जरब नि हुकमत असेल. इत्यादी. थोडक्यात, लोकानी त्या इसमावर त्यांच्या मनातील नेत्याचे चित्र प्रक्षेपित केलेले असते नि उलट त्याने त्या लोकांवर स्वतःच्या मनातील अनुयायांचे चित्र प्रक्षेपित केलेले असते. म्हणून लोकांच्या बाबतीत तो नेत्यासारखा वागत असतो नि त्याच्या बाबतीत लोक अनुयायासारखे वागत असतात.

आपल्याकडे सद्गुरुचा आर्किटाइप आढळतो. अनेक लोक अशा लोकांच्या मागे धावताना दिसतात. आणि कित्येकदा तर ही भक्तमंडळी आपल्या अराध्य-दैवताला प्रतिपरमेश्वर, परमेश्वराचा नवा अवतारही मानताना आढळतात. आता येथे काय होत असते ते पाहा. मानवजातीच्या बालपणापासून मानवजात पार-लौकिकावर विश्वास ठेवित आली आहे. जर तसा विश्वास तिने ठेवला नसता तर आदिम काळात माणसाने मृताचे काळजीपूर्वक दफन केले नसते. तेव्हा परमे-श्वराची कल्पना आपल्या सर्वांच्या डोक्यात पक्की घर करून आहे. जेव्हा जेव्हा माणसे दुसऱ्या एखाद्या व्यक्तीवर परमेश्वरत्वाचा अध्यारोप करतात तेव्हा तेथून पुढे ती व्यक्ती परमेश्वरसदृश नसते तर प्रत्यक्ष परमेश्वरच असते. आणि त्याच्या बाबतीतले त्यांचे खाजगी व सार्वजनिक वर्तन परमेश्वराच्या बाबतीत पारंपरिक अपेक्षेत ठरल्यासारखे असते : तो बाप आपण मुले. इत्यादी. जर्मन जनतेने हिटलरला दिलेला मान वगैरेच्या गोष्टी आपण वर्तमानपत्रातून वाचल्या असतील. हा मान त्या लोकानी बळापायी दिला नव्हता. हे घडू शकते कारण त्या प्रकारचा आर्किटाइप आपणा सर्वांच्या ठिकाणी आहे. जेव्हा आमचा नेता म्हणून एखाद्या इसमाच्या पाठी आपण धावू लागतो तेव्हा त्या इसमाच्या ठिकाणी मूलतः नेतृत्वाचे गुणधर्म असोत अथवा नसोत पण अनेकानी त्याला नेता मानला एवढ्याच केवळ घटनेतून त्याच्याकडून नेतृत्वाची वागणूक बाहेर येऊ लागते. शिवसेनेची जनताचळवळ आणि त्यातील बाळासाहेब ठाकऱ्यांच्या नेतृत्वाचा एकूण उदय आणि विकास नजरेसमोर आणल्यास हे कसे घडते याचे आणखी स्पष्टीकरण द्यावयास नको. अनुयायी बनून होऊ घातलेल्या नेत्याच्या नेतृत्वाला आपण चेतक पुरवतो. तर तोच नेता त्याच वेळी आपल्यातल्या अनुयायित्वाच्या गुणधर्मासाठी चेतक असतो.

•

माझे एक स्नेही आहेत. एरवी गृहस्थ अत्यंत प्रेमळ व दिलदार. पण ऑफिसच्या खुर्चीत ते बसले की त्यांच्या अंगात करडा अधिकारी संचारतो. मग

ते ज्याच्या त्याच्या अंगावर ओरडत असतात. त्यांच्या या वागणुकीमुळे त्यांच्या हाताखालची एकदोन कारकून मंडळी मानसिकदृष्टया कायमची जायबंदी झाली आहेत.

पाप्याचा पुण्यवान, आणि वाल्या कोळ्याचा महर्षी वाल्मिकी होऊ शकतो याचे कारण या दोन्ही प्रकारचे प्रच्छन्न नमुने आपणा प्रत्येकाच्या ठिकाणी आहेत. बंडाची भाषा मतत करणारे अप्रस्थापित प्रस्थापित म्हणून स्थानापन्न होताच त्यांची बंडखोरीची भाषा संपून तेही प्रस्थापितांची बाजू घेऊ लागतात हे तर आपण हरघडी अनुभवतो. सत्ता माणसाला भ्रष्ट करते असे म्हणतात. पण सत्ता माणसाला भ्रष्ट करीत नाही, सत्ता भ्रष्ट करणारच हा जो समज माणसाच्या ठिकाणी पूर्वापार चालत आला आहे तो समज त्याला भ्रष्ट बनवायास भाग पाडतो. मारूनमुटकून का होईना पण सज्जनपणा अंगी चिकटविला गेल्याने अनेक पापी, सज्जन बनले आहेत. उलट दुर्जन नसतानाही दुर्जनपणाचा शिक्का जगाकडून मारला गेल्याने मूलतः सज्जन असणारे अनेक दुर्जन बनल्याची उदाहरणे इतिहासात सापडतात.

धर्माची पीछेहाट झाली आणि अधर्म फोफावला की भगवान विष्णू अवतार घेतो आणि दुर्जनांचे पारिपत्य करून सज्जनाना संरक्षण देतो या कल्पनेचा आर्किटाइप आपणा सर्वांच्या डोक्यात असल्यानेच केवळ ' धर्म बुडाला, भ्रष्टाचार, लाचलुचपत, वशिलेबाजी वाढली, आम्ही हे बंद करणार ' अशा गर्जना करणारांच्या खोटया वल्गनाना आपले भोळसट लोक बळी पडत असतात. प्रारंभी चार लाचार माणसे स्वतःभोवती गोळा करण्याची किमया साधली आणि जनतेवरच्या खऱ्याखोटया अन्यायांचा डिंडिम वाजवता आला की हा हा म्हणता अनेक बदमाश नेतेपदावर चढलेले पाहाता येतात.

आपले सामूहिक अबोध मन ही अशा प्रकारे अगणित कल्पनाठशांची खाणच आहे. हेच आर्किटाइप्स. आर्कि म्हणजे आद्य. आरंभिक. सर्वात आधिचा-चे. टाइप म्हणजे ठसा. ठसे. प्रिमॉर्डियल इमेजिस् असाही दुसरा शब्द या ठशाना आहे. प्रिमॉर्डियल म्हणजेही आधीचे. इमेज म्हणजे मूलभूत स्वरूपाचे मानसिक चित्र. प्रतिमा. मनाच्या रचनेत ही चित्रे सर्वांत आधी सापडतात. याच्या पलीकडे आधीचे मनात इतर काही गवसत नाही. मनाच्या आद्यठिकाणी सापडणाऱ्या या घटकाना जरी आपण चित्रे, प्रतिमा इत्यादी शब्द वापरीत आहोत तरी नेहमीच्या परिचित अर्थाने ही चित्रे नाहीत. चित्रांच्या या अस्पष्ट गर्भित सूचना आहेत. किंवा चित्रांच्या या अस्पष्ट बाह्यरेखा आहेत. या रेखा स्पष्ट झाल्या, सूचना उत्तेजित झाल्या तर त्यात अंतर्भूत असणारी चित्रे आपल्या दृष्टीस येतील. म्हणजे आपल्या मनाला जाणवतील. त्यातला आशय ध्यानात येईल. आशय आपण नेहमी शब्दात अपेक्षितो. पण आशय चित्ररूपानेही असू शकतो. आर्किटाइप् ही आशय सूचित

करण्याची अशी रीत आहे. समजा, शब्दांचा वापर न करता काहीएक आशय व्यक्त करायचा आहे तर तो आपण कसा व्यक्त करू ? चित्रांच्या माळांच्या साहाय्याने. आर्किटाइप्स म्हणजे याच चित्रमालिका.

आर्किटाईप्स असंख्य आहेत. आपल्या प्राक्कथा हे आर्किटाइप्सच असतात. स्वप्ने ही आर्किटाइप्स्चीच करामत असते. माणूस असो वा पशू त्याचे आयुष्य सिच्युएशन मागे सिच्युएशन असे घडते. एक प्रसंग. तो संपला की दुसरा प्रसंग. मग तिसरा. त्यातील समान व ठराविक प्रसंगांचा ठसा आपल्या मनावर ठसतो. तो जर जीवनसमायोजनात साह्यभूत होणारा असेल तर पुढील पिढीच्या मनावरही जन्मतः उमटेल. तेथून तिसऱ्या, चवथ्या वगैरे-पुढील अगणित पिढयांच्या. प्रसंग साधारणतः पूर्ण झालेले गेस्टाल्ट-आकृतिबंध असतात. गेस्टाल्ट म्हणजे पूर्णाकृती. समजा, मी या क्षणी पुस्तक वाचत आहे. पुस्तक वाचताना त्या पुस्तकाशी मी इतका समरस बनलो आहे की भवतालच्या कशाचेच मला भान नाही, हळूहळू मला तहान लागू लागली. पुस्तकातल्या मजकुरावरून माझे लक्ष विचलित झाले. ते आता तहान, पाणी, कोरडा पडलेला माझा घसा यांच्याकडे वेधले. आता पुस्तकाच्या मजकूराचा पहिला गेस्टाल्ट जाऊन त्या जागी तहान व पाण्याचा दूसरा गेस्टाल्ट आला, असे अनेक पूर्णाकार गेस्टाल्ट आपल्या डोक्यात आहेत. हे मानसिक गेस्टाल्ट म्हणजेच युंग यांचे आर्किटाइप्स. आर्किटाइप्स् आनुवंशिकतेच्या कायद्याने एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे पिढ्यानपिढ्या संक्रमित होत असतात.

आपल्या शारिरीक मानसिक वागणुकांचे साचे कसे असतात हे आपणा प्रत्येकाला माहित असेल. बाया पक्षी बाया पक्ष्याच्या जातीप्रमाणे घरटी बांधतो. तो कावळ्याच्या जातीप्रमाणे घरटी बांधणार नाही. कावळा कावळ्याच्याच पद्धतीने घरटी बांधतो. मग तो भारततला कावळा असो की पाकिस्तानातला ! हा घरट्यांचा साचा जन्मतःच त्याच्या डोक्यात असतो. थोडक्यात, प्रत्येक प्रजातीची जीवनपद्धती आनुवंशिक आहे, आणि तीप्रमाणे त्या प्रजातीचा प्रत्येक घटक आपले जीवन जगतो. आपले हृदय एका विशिष्ट पद्धतीने वागते. यकृतही तसेच विशिष्ट पद्धतीने वागते. कारण त्यांची त्यांची विशिष्ट पद्धत आपण जन्मतःच बरोबर घेऊन आलेलो असतो. जशी हृदय चालण्याची पद्धत आपण बरोबर घेऊन जन्मतो. तशाच प्रकारे इतर शारिरीक-मानसिक हालचालींची पद्धतही बरोबर घेऊन जन्मतो. ही पद्धत आर्किटाइप्सच्या स्वरूपात असते. आपले सामूहिक अबोध मन म्हणजे या सगळ्या आर्किटाइप्सचा एकत्रित संग्रह. किंवा मानसिक चित्रप्रतिमांची एकत्रित बेरीज. असो. •

सामूहिक अबोध मन हे आनुवंशिक मानसिक चित्रांचे बनलेले असते. ही गोष्ट खरी असली तरी हा चित्रसंग्रह कधीही स्थिर नसतो. तो अत्यंत गतीशील,



अनुक्रमणिका

डायनॅमिक आहे. सतत त्यात हालचाल सुरू असते. याचे कारण असे की ही सगळी चित्रे आपल्या सहजप्रवृत्तींशी, आपल्या उपजत मानसिक ऊर्जेशी संबंधित असतात. कारण त्या ऊर्जेतूनच ती बाहेर आलेली असतात. आपले आद्यमन म्हणजे ही चित्रेच होत. ही चित्रे म्हणजे वैचारिक संकल्पना किंवा जगाच्या स्वरूपासंबंधीच्या बौद्धिक व्याख्या नव्हेत. त्यांची तुलनाच करायची झाल्यास ती प्राक्कथांच्या आंतरिक संरचनांशी करता येईल. प्राक्कथा म्हणजे या मानसिक वळणांचे बाह्य कवच. ही वळणे जेव्हा व्यक्त होतात तेव्हा ती साधारणतः प्राक्कथेत येणाऱ्या मानसिक-भावनिक चौकटींचे रूप घेतात. आर्किटाइप अर्थात संपूर्णतः अबोध, अदृश्य असतो. आपण पाहातो ते त्या आर्किटाइपच्या आंतररचनेचे बाह्य व प्रगट आविष्कार. प्रगट परिणाम, या परिणामांवरून आर्किटाइपच्या एकूण संभाव्य बांध्याची कल्पना आपण करू शकतो. स्वभावतः आर्किटाइप ही केवळ ऊर्जा, फोर्स, शक्ती आहे. ही शक्ती तुम्हाला पछाडू शकते. मारू शकते. आर्किटाइप स्वतः स्वायत्त असतात. त्यांच्यावर इतर कशाची हुकमत चालू शकत नाही. म्हणून जर का एखादा इसम अशा एखाद्या आर्किटाइपच्या तडाख्यात गवसला तर त्याचे काय वाटेल ते होऊ शकते. जर का एखाद्या आर्किटाइपच्या कचाट्यात तुम्ही गवसला तर काही केले तरी तुम्ही त्याच्यातून बाहेर पडू शकत नाही. निदान काही काळपर्यंत, त्या आर्किटाइपची जादू मनावरून उतरेपर्यंत तरी. एक अत्यंत सुंदर पण वयाने कोवळी असलेली तरुण मुलगी तिच्या बापासारख्या असणाऱ्या साठ वर्षांच्या म्हाताऱ्याच्या प्रेमात पडून आईवडिलांना धुडकावून त्या म्हाताऱ्याशी अशीच राहाताना मी पाहिली आहे.

फ्रॉईड यानी शोधून काढलेला इडिपस गंड हा अनेक गंडांपैकी किंवा आर्किटाइपपैकी एक आर्किटाइप आहे. असाच गंड मुलींच्या बाबतीतही आढळू शकतो. इडिपस गंड ही मुलांची स्वतःच्या आईवडिलांशी वागण्याची एक रीत झाली. आईवडिलांशी (किंवा त्यांचे जे चित्र अर्भकावस्थेतल्या अनुभवातून मुलाच्या मनात उत्तेजित झाले असेल त्या चित्रांशी) जमवून घेण्याची, त्यांच्या प्रभावातून बाहेर पडून स्वतंत्र बनण्याची एक पद्धत झाली. किंवा मुलगा आपल्या आईवडिलांशी किंवा आईवडिलांच्या बोधचिन्हातून सूचित होणाऱ्या सर्व प्रकारच्या आशयांशी कशा प्रकारे जमवून घेऊ शकतो याचे दिग्दर्शन करणारा एक मानसिक साचा झाला. असे अनेकविध साचे-आर्किटाइप्स आपल्या मनात आहेत. इडिपसगंडाची कार्यपद्धती जर का आपण अभ्यासली तर आर्किटाइप्स कसा कार्य करतो हे आपल्या लगेच ध्यानात येईल. आर्किटाइप हा एक खराखुरा जिवंत जीवनप्रसंग असतो. आदी, मध्य आणि शेवट असणारा. येथे आई आहे, मुलाचे वडील आहेत आणि प्रत्यक्ष मुलगा आहे. या तिघांच्या जीवनाभोवती परस्परसंबंधासंबंधी हे सगळे नाट्य रंगते. मुलाचे-आईचे परस्पर-संबंध,

त्यातल्या भावना नि मनोविकार. बाप नि मुलाचे संबंध आणि शेवटी आई-बाप व मुलगा या सर्वांचे परस्पर-संबंध याचे एक अभिजात नाट्य तेथे आहे. या तिघांच्या परस्पर–संबंधातून ( लक्ष्यात घ्या की हे सर्व संबंध एकट्या इडिपसच्या ठिकाणी मानसिक पातळीवर स्वतःचा गुंता सोडवू ) पाहात आहेत. येथे आई जितकी प्रत्यक्ष आहे तितकीच ती इडिपसच्या डोक्यातली – इडिपसच्या डोक्यात माते-विषयीच्या त्याच्या कल्पनेतून तयार झालेली काल्पनिकही आहे. तीच गोष्ट बापाचीही. बाप प्रत्यक्ष आहे तसाच इडिपसच्या डोक्यातला काल्पनिकही आहे. आपण येथे काल्पनिक शब्द वापरला. पण काल्पनिक म्हणजे ज्याला काहीच वास्तवता नाही, जे केव्हाही झटकून टाकता येईल असे नव्हे. ही एक वेगळ्या प्रकारची वास्तवता म्हणता येईल. माणसाला सतत दोन वास्तवांशी जमवून घ्यावे लागते. एक बाहेरच्या प्रत्यक्ष, घन वास्तवाशी. दुसऱ्या त्याच्या आतल्या अंतस्थ वास्तवाशी. माणसाच्या आतल्या वास्तवात (= जगात) ज्या घडामोडी (सिच्यु-एशन्स) चालू असतात त्यांचा परिणाम त्याच्या बाहेरच्या वर्तनावर फार मोठ्या प्रमाणावर होत असतो. माणूस एकाच वेळी या प्रकारच्या दोन वास्तवात वावरतो. बाहेरच्या नि आतल्या. बाहेरचे वास्तव बहुतांशी बोध असते तर आतले अबोध असते. इडिपस कथा म्हणजे एका मुलाच्या आयुष्यात वयाच्या एका ठराविक टप्प्यावर निर्माण झालेला मानसिक गुंता स्वतःला सोडवू पाहात आहे. जेव्हा एखाद्या जीवनात हा गुंता घडतो तेव्हा तो गुंता कसा तयार होतो, कसा पुढे सरकतो नि शेवटी कशा प्रकारे सुटतो याचे उत्तम चित्रण येथे आपणास मिळते.

आर्किटाइप म्हणजे संक्षिप्त केलेले एक जबरदस्त जीवननाट्यच होय. जेथे पूर्ण जीवनप्रसंगावर आधारित पूर्ण जीवननाट्य आढळते त्याच मानसिक चित्र-मालिकाना खऱ्या अर्थाने आर्किटाइप म्हणतात. या जीवननाट्याला अशा अशा प्रकारे प्रारंभ होतो. पुढे ते अशी अशी कलाटणी घेते. नि या विशिष्ट प्रकारे त्याचा शेवट होतो. हे सर्व ज्यात संक्षिप्त सांकेतिक चिन्हात अंतर्भूत होऊन राहिलेले असते तो सगळा मानसिक आराखडा म्हणजे एक विशिष्ट आर्किटाइप. पक्षी घरटी कशा प्रकारे बांधतात ते पाहा. प्रत्येक जातीच्या पक्ष्याच्या घरट्याचा एक एक स्वतंत्र साचा आहे. या साच्यातच तो पक्षी आपले घरटे बांधील, आणि घरटे बांधण्याच्या प्रारंभालाच घरट्याचा मध्य आणि घरट्याचा शेवट तेथे जणू अस्तित्वात असतो. घरट्याचा संपूर्ण गेस्टाल्ट प्रारंभापासूनच तेथे आहे. हा पूर्णाकार गेस्टाल्ट म्हणजे आर्किटाइप.

मनुष्याच्या आयुष्यक्रमात एवढ्या वर्षांत अनेक स्थित्यंतरे घडून आली आहेत. पण तरिही काही जीवनप्रसंग पूर्वी होते तेच आजही राहिले आहेत. त्यातून निर्माण होणाऱ्या अडचणींची उत्तरेही सर्वसाधारणपणे तीच राहिली आहेत. माणूस जन्मतःच जग आणि जीवनासंबंधीची अगणित चित्रे बरोबर घेऊन जन्मास

घेत असतो. जन्मल्यानंतर या चित्रात आणखी नव्या चित्रांची भर पडते. तसेच जन्मतः जी चित्रे मूलतः अस्पष्ट, विरविरीत असतात ती ठळक बनतात. माणसाच्या बाबतीत असे म्हणता येईल की माणूस जन्माबरोबरच जगाविषयीची एक जबरदस्त आस्था ( Concern ) घेऊन जन्मास येतो. जन्मापासूनच जगाबरोबरचा त्याचा संबंध चालू होतो. नव्हे जगाबरोबर स्वतःला जोडून घ्यावे ही एक उपजत भावनाच त्याच्या ठायी जन्मतः असते. माणसाच्या आयुष्यातले जोडून घेण्याचे किंवा प्रेम करण्याचे पहिले ऑब्जेक्ट, पहिली प्रियवस्तू म्हणजे त्या माणसाची आई. पहिले काही महिने तर बालकाला फक्त शरिर किंवा शरिराची भाषा तेवढीच समजते. ज्याला आपण बौद्धिक विचार व तत्त्वे म्हणू ती त्याच्यापाशी नसतात काय होईल ते शरीर. अर्भकावस्थेत जाणवणारी प्रत्येक गैरसोय ही त्याच्या दृष्टीने त्याच्या अंगावर चालून येऊ पाहाणारे जणू संकट असते. तसेच प्रत्येक सुखसोय (कंफर्ट) त्याला समाधान, आनंद मिळवून देत असते. जेव्हा त्याच्या शरिराला काही गैरसोय जाणवते तेव्हा अर्भक धास्तिग्रस्त बनते. कारण त्याच्यापाशी विचाराची शक्ती नसल्याने ती गैरसोय त्याला समजून घेता येत नाही. या सगळ्या घडामोडींमुळे त्याच्या डोक्यात सतत काही ना काही मानसिक चलविचल घडत राहाते. तसेच जन्मल्यानंतर थोड्याच दिवसात मूल जे जे बाहेर पाहात असते ते ते सर्व फक्त अनुभवितच नाही तर चित्ररूपात स्वतःमध्ये ओढून घेत असते. तशाच प्रकारे बाहेर जे जग त्याला जाणवते त्या जगाला स्वतःच्या मनातले मनोविकार नि भावना चिकटविण्याकडेही त्याची पहिल्यापासून प्रवृती असते. थोडक्यात, जन्मतः मूल जो Body-ego किंवा शरीर-म्हणजेच-' मी 'ची भावना घेऊन येते, तो त्याचा ' इगो ' हळुहळू पण निश्चितपणे घडत जात असतो. हा इगो integrative असतो. घेतले जाणारे सर्व अनुभव सुसंघटीत करू पाहाणारा असतो. फ्रॉईड मानतात त्याप्रमाणे बाह्य जगाशी केवळ जमवून घेऊ पाहाणारा नव्हे. अर्भकावस्थेत मूलापाशी चिकित्सक बुद्धी किंवा बौद्धिक विचार इत्यादी नसल्याने ते मूल जे जे अनुभवते ते ते सर्व त्याच्या भावनानी प्रभावित झालेले असते. आनंददायक अनुभव त्याला एका प्रकारे जाणवतात. तर दुःखदायक अनुभव त्याच्यापेक्षा अगदी वेगळ्या प्रकारे जाणवतात. या सर्व अनुभवातून त्याच्या डोक्यात सतत फॅन्टसी चालू राहतात. चमत्कृतिपूर्ण कल्पनाविलास सुरू राहातो. मात्र हा कल्पनाविलास म्हणजे दिवास्वप्ने नव्हे. हा कल्पनाविलास मनाच्या अगदी आतल्या, अबोध पातळ्यावर सुरू असतो. नि त्या कल्पनाविलासातून जगाविषयीची खरीखोटी, यथार्थ वा विपर्यस्त चित्रे हालचाल करीत असतात. बालकाच्या मनोविकाराच्या ( इमोशन ) प्रत्येक हालचालीबरोबर हे कल्पनाविलास अबोध मनात घडत राहातात. बालकाच्या वाढीबरोबर हे कल्पनाविलास अधिकाधिक तपशिलवार बनू लागतात. आणि त्यात अधिकाधिक जीवनप्रसंगांचा नि व्यक्तींचा समावेश







होत जातो. हे कल्पनाविलास कधीही थांबत नाहीत. आयुष्यभर ते चालूच राहातात. आपले कलाविष्कार, आपली शास्त्रे नि आपले दैनंदिन जीवन यांच्यावर त्यांचा फार मोठा प्रभाव पडत असतो. बाहेरच्या जगाच्या अनुभवातून व संवेदनांतून जशी जगाविषयीची ( उदा. भूक लागताच स्तनाशी धरणारी म्हणून मायाळू आई आणि रडून आकांत केला तरी जवळ न येणारी म्हणून राक्षसी ) चित्रे आत तयार होत जातात. तशाच प्रकारे याच संवेदनांबरोबर आतली मूळची जी चित्रे असतात तीही उत्तेजित होऊन ठळक बनत जातात. मूल अशा प्रकारे एकाच वेळी दोन दोन जगांशी जमवून घेऊ पाहात असते. एक त्याच्या आतल्या फॅन्टसीच्या, त्याने बाहेरून आत शोषून घेतलेल्या, जन्मत: आनुवंशिकतेने मिळालेल्या आणि दोन, त्याच्या बाहेर स्वतःच्या हक्काने अस्तित्वात असलेल्या वस्तुनिष्ट जगाशी. हे जमवून घेणे बव्हंशी मनाच्या आतल्या पातळयांवर घडून येते. असो. तर अशा प्रकारे मनाच्या आत आधीपासून असणारे आर्किटाइप्स प्रसंगाप्रसंगाने ठळक बनतात. आणि त्याच वेळी वैयक्तिक अनुभवांबरोबर जगाविषयीच्या-जगाबरोबर म्हणजे जगातल्या कोणा ना कोणा जिव्हाळयाच्या व्यक्तिबरोबर वगैरे जे परस्पर-संबंध प्रस्थापित होत असतात त्याच्या नव्या चित्रांची त्यात भर पडत जाते.

मूलतः अनुवंशिकतेने आलेल्या सर्व चित्राना जरी आर्किटाइप हा शब्द आपण लावित असलो तरी खऱ्या अर्थाने पाहाता ज्यात जीवनविषयक काही प्रसंगांचा समूह अंतर्भूत असतो त्याच चित्रमालिकाना आर्किटाइप शब्द वापरता येईल. इडिपस-गंड हा खरोखरीचा आर्किटाइप. तशाच प्रकारे वयाच्या चाळिशीनंतर संसारातून हळूहळू निवृत्त होऊन परमार्थाकडची वाटचाल सूचित करणाऱ्या ज्या प्राक्कथा देशोदेशीच्या प्राचीन वाङ्मयात आढळतात त्यातील चित्रमालिकानाही आर्किटाइप शब्द लावता येईल. आर्किटाइप म्हणजे बाह्य आकारांची आत ओढून घेतलेली ( internalised ) चित्रे नसून ती जीवनप्रसंगांची नाटचे असतात, आर्किटाइप्स अत्यंत कॉम्लेक्स आहेत तसेच अस्पष्ट आहेत. एकाच प्रधान कल्पनाबंधाची अनेक चित्रे एकावर एक अशी तेथे आढळतील. साधा आईचा आर्किटाइप घ्या. आईची अगणित रूपे मूल अनुभवते. प्रेमळ आई. खाष्ट आई. आक्रस्ताळी आई. निष्ठुर आई. इतके सगळे रंग त्या एका आर्किटाइपमध्ये असतील.

आर्किटाइप मूलतः कसे तयार होत गेले याचेही वर्णन करता येईल. अर्थात कल्पनाशक्तीच्या. साहाय्याने. कारण आर्किटाइपची प्रक्रिया मनाच्या अगदी आतल्या थरांवरून चालते. Anima चा आर्किटाइप घ्या. Anima म्हणजे स्त्री किंवा अगदी बरोबर म्हणजे स्त्रीत्व. मानवी संस्कृतीत जेवढे ' रोल्स ' स्त्री करते तेवढयांचा समावेश ॲनिमाच्या आर्किटाइपमध्ये होतो. त्यातील अनेक

बारिकसारीक भेदाभेदांसकट. अनेक वेगवेगळ्या नात्याने स्त्रीशी पुरुषाचा संबंध येतो. स्त्री-माता, भगिनी, सखी, प्रेयसी, पत्नी, वगैरे. या प्रत्येक नात्यात अंतर्भूत असणारा चेतक नि त्या चेतकाचे प्रतिसाद या सर्वांची एकत्रित बेरीज म्हणजे ॲनिमाचा आर्किटाइप. तसेच स्त्रीच्या स्वभावाचे जे अगणित विशेष आहेत तेही या चित्रात अंतर्भूत असतील. स्त्रीविषयक आर्किटाइपप्रमाणेच पुरुषविषयक आर्किटाइपही मानवी मनात आहे. त्याला Animus असे नाव आहे.

आपल्या चालू संदर्भात सर्वात महत्त्वाचा आर्किटाइप सेल्फचा. ( Self ) आत्मतत्त्वाचा. हा कोठला स्वतंत्र आर्किटाइप नाही. म्हणजे कोठल्या स्वतंत्र अनुभवक्रमाचे ते स्वतंत्र चित्र नाही. तर मनाच्या ठिकाणी जी सर्व मूलचित्रे आहेत त्या सर्व मूलचित्रांचे मिळून एक सर्वांगीण चित्र जर आपण तयार केले तर ते सर्वांगीण चित्र म्हणजे सेल्फचे मूलचित्र होय. सेल्फमध्ये सर्व आर्किटाइप्स समाविष्ट असतात. पण सेल्फचा आणखी एक अर्थ आहे. आर्किटाइप्स हे शारिरीक-मानसिक-भावनिक प्रौढत्वाच्या मार्गावरचे टप्पे आहेत असे वर एके ठिकाणी आपण म्हटले आहे. आता अशी कल्पना करा की एखादा इसम हे निरनिराळे टप्पे व्यवस्थित प्रकारे ओलांडून आपल्या इच्छित मुक्कामाला पोचला म्हणजे प्रत्येक टप्प्यावर त्या टप्प्याची म्हणून जी identity असेल, जे प्रौढ व्यक्तित्व असेल ते त्याने मिळविले नि आयुष्याच्या शेवटच्या टप्प्यात त्याने पदार्पण केले तर त्याचे सेल्फ त्याने गाठले असे म्हणता येईल. सेल्फ म्हणजे आत्मविकासाचा अंत. आत्मपरिपूर्ती. या अर्थाने हा शब्द अर्थातच फारच थोड्या evolved किंवा पूर्णवाढ व्यक्तित्वाना लावता येईल. उदा. कृष्ण, बुद्ध, कन्फ्युशिअस, जिजस अशा जगातल्या फक्त थोड्यानाच त्यानी सेल्फ गाठले होते असे म्हणता येईल.

सेल्फ म्हणजे अशा प्रकारे आर्किटाईपांचा प्रारंभही असतो नि शेवटही असतो. व्यक्तित्वाला सुरवात सेल्फच्या आर्किटाइपाने होते आणि शेवट या आर्किटाइपातील संभाव्य आर्किटाइप पार पडल्यानंतर होतो. सेल्फमध्ये मानवी अनुभवांच्या नि कर्तृत्वाच्या दिशांचे सर्व आराखडे आहेत. कधी हे आराखडे प्रत्यक्षात येतात. कधी जागच्या जागी खचून जातात. फोटोच्या निगेटिव्ह कशा आधी अस्पष्ट, धूसर असतात. केमिकलमध्ये बुडवल्या की स्पष्ट बनतात. त्यांचे ठळक फोटो बनतात. तसे हे आर्किटाइप्स सेल्फमध्ये राहातात. माणसाचे सगळे स्वातंत्र्य म्हणजे सेल्फचे स्वातंत्र्य. माणसाच्या कर्तृत्वाचे सगळे नकाशे तेथे आहेत. म्हणूनच निवडीच्या शक्यता प्रत्येकासाठी आहेत. पण माणूस देह आहे. या सगळ्या शक्यता त्या देहासाठी आहेत. त्या देहातीत नाहीत. देहानेच त्यांचे रूपांतर प्रत्यक्षात होणार आहे. शिवाय एक शक्यता निवडताच त्या शक्यतेबरोबरच्या इतर अनेकांना नकार द्यायचा आहे. म्हणून हे मर्यादाबद्ध स्वातंत्र्य, सान्त स्वातंत्र्य आहे.

तसेच सेल्फ आदेश दाखवित नाही. फक्त शक्यता दाखविते. तेथे होणारच अशी शाश्वती नाही तरिही मरण येईपर्यंत भविष्य तेथे मोकळे आहे. ते आधी निश्चित झालेले नाही. किंवा सेल्फला शेवट असतो या अर्थाने ते पूर्वनिश्चित आहे असे म्हटले तरी सेल्फच्या शक्यता इतक्या अगणित आहेत की त्या शक्यता विचारात घेता माणूस स्वतंत्रच आहे असे म्हणावे लागेल. माणसाच्या आयुष्याची मूळ रचना स्वतंत्रतेची आहे. अर्थात सेल्फ मुभा देईल तेवढी. पण तरिही मानवी व्यक्तित्वाच्या बाबतीत प्राथमिक वस्तुस्थिती स्वातंत्र्याची आहे. सेल्फ म्हणजेच त्या स्वातंत्र्याची हमी. सेल्फ म्हणजे भावी व्यक्तित्वविकासांचा ढोबळ आराखडा. आणि सेल्फ म्हणजे तो प्रत्यक्ष व्यक्तित्वविकाससुद्धा. विकासाचे दैवी तेज.

× × × ×

[ क्रमशः ]

---

मूळाक्षरे जगात फिनिशियन लोकानी सर्वात आधी शोधून काढलो नि ग्रीकानी ती त्यांच्यापासून उसनी घेतली. पण ग्रीकानी केलेला त्यांचा वापर नि फिनिशियनांचा वापर या दोन वापरात भलतीच तफावत आहे. कदाचित असे तर नाही ना की जे आम्ही इतरांकडून उसने घेतो त्याची आम्हाला अपूर्वाई असल्याने त्याचा अधिक काळजीपूर्वक नि कल्पक उपयोग करण्याकडे आपली प्रवृत्ती असते ! शेवटी शोध म्हणजे काय ? कधीकधी तो केवळ योगायोग असतो तर कधीकधी नसत्या उचापतीची ती निष्पत्ती असते, तर कधीकधी स्वतःच्या अंगात कसलाच विशेष गुण नसल्याने सदा खंत करीत राहाणाऱ्या असंतुष्ट आत्म्यांचीही ती कर्तबगारी असते.

— एरिक हॉफर.



अनुक्रमणिका

# समाज आणि संस्कृती

## लोककला आणि लौकिककला ( ६ ) :

**–अर्नोल्ड हॉझेर**

लोककलेला स्वतःचे वैशिष्ठ्य आहे. स्वतःची स्वतंत्र शैली आहे. आणि इतर कलाप्रवाहांपासून ती वेगळी आहे. म्हणजेच तिची स्वतःची महती आहे. परंतु इतके सगळे जरी खरे असले तरी लोककला ही कला आहे की नाही हे ठरविता येण्यासाठी लोककलेला खास स्वतःचा असा इतिहास आहे हे प्रथम सिद्ध करून द्यावे लागेल. लोककलेला इतिहास आहे असे जर सिद्ध करता आले तरच लोककलेची गणना कलेत करता येईल. प्रश्न असा आहे की इतिहास या शब्दाच्या खऱ्या अर्थाने लोककलेला इतिहास आहे काय ? की लोककलेला इतिहास आहे असे आपण म्हणतो तेव्हा इतिहास हा शब्द आपण काही विविक्षित संकुचित अर्थाने वापरीत असतो ?

सांस्कृतिक किंवा शैक्षणिक पातळीच्या तत्वावर जे कलेचा इतिहास रचतात ( उदा. समाजातील उच्च स्तरावरच्या लोकांची कला ती अभिजात कला, मध्यमवर्गाची कला ती नागरी कला व ग्रामीण जनतेची कला ती ग्रामीण कला ) ते लोककलेला कला म्हणून स्वतःचा इतिहास असू शकतो या तत्वावर कधीही विश्वास ठेवू शकणार नाहीत. त्यांच्या गृहित कृत्यातच या प्रकारच्या तीन स्वतंत्र कलाप्रवाहांच्या सूत्राला वाव नाही. शैक्षणिक किंवा सांस्कृतिक स्तर ही एक सलग अशी प्रक्रिया आहे. तिचे तीन पृथक् आणि परस्परनिरपेक्ष असे भागच अस्तित्वात असू शकत नाहीत. उच्च स्तर हा मध्यम आणि कनिष्ट स्तराच्या तुलनेत उच्च स्तर असतो. स्वतःच्या खास हक्काने नव्हे. जी गोष्ट उच्च स्तराची, तीच मध्यम आणि कनिष्ट स्तरांचीही. यातील प्रत्येक स्तर हा उरलेल्या स्तरांच्या तुलनेत उच्च वा मध्यम वा कनिष्ट असतो. म्हणून तेथे लोककलेच्या स्वतंत्र आणि वेगळ्या कलाइतिहासाला जागा नाही.

शिक्षितांच्या कलाविष्काराचे स्वरूप फार झपाट्याने बदलते. त्याच्या उलट लोककलेत असे बदल फार संथपणे घडून येतात. लोककलांचे स्वरूप बऱ्याच काळपर्यंत न बदलता टिकून राहाते. अर्थात एवढ्या आधारावर लोककलेला कुणीही कलेचा स्वतंत्र व पृथक् प्रकार मानणार नाही. तसेच तिच्या वाढीचा व टिकण्याचा स्वतंत्र कायदा आहे असेही कोणी म्हणणार नाही.



अनुक्रमणिका

कारण असे की लोककलेचे खुद्द अस्तित्वच मुळी इतर, वाह्य प्रभावांच्या अस्तित्वावर अवलंबून आहे. लोककला जानपदवाह्य प्रभावातून निर्माण होते. त्याच प्रभावांवर पोसते. मोठी होते. उच्च स्तरांकडून मिळणाऱ्या सांस्कृतिक साधनसामुग्रीवर लोककलेतील बदल अवलंबून असतात. याचाच अर्थ असा की लोककला स्वतःच्या गतिनियमानुसार घडत नाही वा बदलतही नाही. वरची कला वदलली की तिच्याकडून मिळालेल्या सांस्कृतिक ठशांनुसार लोककलाही बदलते. या परिस्थितीत अर्थातच लोककलेला अनुक्रमवार, सलग असा कला-इतिहास असतो अथवा तेथे कलात्मक उत्क्रांती आढळते ही गोष्ट सिद्ध करता येण्यासारखी नाही. याच्या उलट लोककलेतले सगळे नाविन्यपूर्ण बदल हे उच्च-स्तरीय कलाभिव्यक्तीकडून आलेल्या चालनातून घडत असल्याने लोककलेचा प्रवाह अप्रतिहत कधीच आढळत नाही. लोककलेच्या प्रवाहात इतकी धरसोड आणि इतका तुटकपणा आढळतो, इतक्या उणीवा आढळतात की या सर्व अड-चणीतून मार्ग काढून लोककलेचा इतिहास तयार करणे ही प्रायः अशक्य गोष्ट असते. हा प्रवाह कधी मध्येच एकदम तुटतो. तर कधी अनपेक्षितपणे वदलतो. केव्हा एकदम लुप्तच होतो. अशा अनेक अडचणी लोककलेच्या कलाइतिहास लिहिण्याच्या बावतीत आहेत. अर्थात मनुष्य आहे तेव्हापासून त्या मनुष्याची लोककलाही आहे. जानपदजन झाले म्हणून त्याना कलात्मक हौशी नसतात असे नाही. त्यानाही कला व कलानिर्मिती आवडते आणि तसे प्रयत्न करावेसे वाटतात. परंतु जानपदजनाना ऐतिहासिक दृष्टी नसल्याने आणि आपल्या कलानिर्मिती जपून ठेवाव्यात अशी भावना त्यांच्या ठिकाणी नसल्याने ते प्रयत्नपूर्वक स्वतःच्या कलाकृती जपून ठेवित नाहीत. या बावतीत जानपदीय लोक अत्यंत अव्यवस्थित, बेमुर्वतखोर आणि निष्काळजी असतात. त्याच्या उलट उच्चस्तरीय शिक्षित लोक आणि धर्मसंस्था वगैरे यांना कलेचे मूल्य कळत असल्याने व कलेची दृष्टी असल्याने स्वतःच्या कलाकृती ते जपून ठेवतात. तेव्हा जानपदजनांच्या लोककलेचा प्रारंभ केव्हा झाला याविषयी निश्चित माहिती मिळू शकत नाही.

लोककलेच्या प्रारंभासंबंधी ठाम विधान करता न येण्याचे दुसरे कारण असे की लोककला ही खरोखरच जानपदजनांची कला आहे की त्यात आणखी कोठून कोठून आलेले घटक मिसळले आहेत की ती सर्वच इतर कुणाकडून घेतलेली आहे ? यापैकी कोठल्याच प्रश्नाचा निश्चित उलगडा करता येण्यासारखी परिस्थिती लोककलेच्या बावतीत अस्तित्वात नाही. उच्चस्तरीय कलाप्रवाहातून इतक्या विविध प्रकारची उसनवारी आणि उचलेगिरीही लोककला करीत असतात की यातील त्यांचे स्वतःचे कोठले आणि परक्यांकडून घेतलेले कोठले याचीच शहानिशा करता येत नाही. परिणामतः कधीकधी जेव्हा अत्यंत प्राचीन अशा कालखंडातल्या कलाकृती गवसतात तेव्हा त्यांच्याही कारागिरीसंबंधी निश्चित मत ठरविता येत नाही. ही

कारागिरी जानपदीय जनांची होती, की एखाद्या अध्यात्मिकच्या कलाकाराची की आणखी कुणा अडाण्याची याचाच उलगडा त्या कलाकृतींकडे पाहून करता येण्यासारखा नसतो. कारण लोककलांची अशी खास वैशिष्ट्ये निश्चित करता आलेली नाहीत. लोककलांचा कलाइतिहास लिहिण्याच्या बाबतीतली ही सर्वात मोठी अडचण आहे.

तथापि लोककलातही कधीकधी शैलीसंबंधी एक सलग अशी अखंड रेखा आढळते. शैलीची अखंडता लोककलात कधीच आढळत नाही असे नाही. परंतु शैलीच्या धरसोडींच्या तुलनेत शैलीची ही एकात्मता इतकी अपवादात्मक असते की भरीव आणि अखंड शैलीच्या अभ्यासातून लोककलांच्या कलाइतिहासावर प्रकाश पाडील असे काहीच हाती लागत नाही. लोककलांच्या स्वरूपात अनेक ठिकाणी तुटकपणा आढळतो आणि त्यांचे एकूण स्वरूपही संदिग्ध असल्याने लोककलांचा एकूण प्रवाह नागमोडी वळणाचा व तुटकतुटक असा वाटतो. वास्तविक लोककलांच्या आयुष्यात या प्रकारचा तुटकपणा आणि नागमोडी वळणे दिसता नयेत. कारण ज्या सांस्कृतिक उत्पाती संकटांमुळे वरच्या वर्गांचे सांस्कृतिक जीवन मुळापासून ढवळून निघालेले असते त्या उत्पातांची व संकटांची केवळ वरवरची झळ तेवढी जानपदीय जनतेला लागत असते. शहरात काहीही होवो ग्रामीण जीवन त्याच संथपणाने सुरू असते. तेव्हा अशा प्रकारचे उत्पात व संकटे शहरवासीय उच्चवर्गीय लोकांच्या जीवनरहाटी संपूर्णतया बदलून टाकतात. मात्र त्याच वेळी जानपदीय आयुष्यक्रमाला मात्र वरवर स्पर्श करण्यापलिकडे ती काहीच करीत नाहीत. अशा परिस्थितीत वास्तविक लोककलांच्या प्रगतीत एक प्रकारची अखंडता दिसावयास हवी होती. पण ती दिसत नाही ही गोष्ट खरी. अर्थात लोककला प्रारंभापासून शेवटपर्यंत एकाच थरावर राहतात, किंवा त्यांच्यात कोठल्याही प्रकारचे बदल संभवत नाहीत अशा प्रकारचा तर्क यावरून कोणीही करू नये. लोककलांच्याही स्वरूपात सूक्ष्म अशा प्रकारचे बदल घडत असतात. लोककलांचा कलाइतिहास लिहिणे का कठीण आहे याला हेही एक कारण आहे. कारण हे बदल एकमेकांशी जोडून दाखविणे कठीण असते.

कला-इतिहासकार शैलींच्या नमुन्यांवरून कलांचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करतात. परंतु हाही प्रयत्न या ठिकाणी उपयोगी ठरत नाही. कारण अशा प्रकारचे निश्चित नमुने आणि त्यांचा कालखंड येथे जोडून दाखविता येत नाही. शैलीचा कालखंड निश्चितार्थाने ठरविता येत नाही व ठरविता आला तरी तो अदमासाच्या स्वरूपाचा असतो. कला-इतिहासाचे आणखी एक सूत्र म्हणजे विकासाच्या आद्य, मध्य, अंतिम टप्प्यांचे. पण आद्य-मध्य-अंतिम यांसारख्या विकासात्मक सूत्रात या कलाकृती बसविता येत नाहीत. कारण अशा प्रकारची एकरेषी प्रगती येथे दिसून येत नाही.

लोककलेचा कलाइतिहास का लिहिता येणार नाही यासंबंधीचे हे सर्व आक्षेप. या सर्व आक्षेपात जरी बऱ्याच प्रमाणात तथ्य असले तरी त्याचा अर्थ लोककलेच्या स्वरूपात कोठल्याही प्रकारची प्रगती झाली नाही; लोककला आरंभापासूनच एका कायम स्तरावर राहात आहे असा त्याचा अर्थ मात्र नाही. लोककलेतही विकास आणि वाढ आहे. आणि विकास आणि वाढ व बदल आहे म्हणून तेथे इतिहास आहे, म्हणून लोककलेल्या संबंधात असे जर कोणी म्हणू लागला की "लोककला शैलिच्या फक्त आद्यतन स्तरावरच कायम कुंठित होऊन राहिली आहे" तर ते अत्यंत चुकीचे ठरेल. उच्च सांस्कृतिक कलांचे निकष वापरून पाहता या कलाकृती "बाळबोध," "एकछापी," "प्राथमिक स्वरुपाच्या" व "अल्पसंतुष्टपणाच्या" वाटतात ही गोष्ट खरी. परंतु हे सर्व विशेष त्या त्या इतिहासाच्या कालखंडाच्या अनुरोधाने आढळतात. प्रत्येक नव्या कालखंडाबरोबर लोककलेच्या मूळ स्वरुपात काही ना काही बदल घडून येतात आणि हे बदल पुन्हा "बाळबोध," "एकछापीपण," "अल्पसंतुष्टपण" हे स्वरूप घेतात. म्हणून लोककलेच्या स्वरूपात बदल कधी अजिबात घडतच नाहीत हे मत आपण ग्राह्य मानता नये. इतर कलाप्रकारात ( उच्चवर्गीय, मध्यमवर्गीय वगैरे ) जसा शैलिचा सुस्पष्टपणा आढळतो तसा लोककलांच्या ठिकाणी आढळत नाही याचे कारण हे आहे की या शैली लोककला वरच्या वर्गांकडून उसनवारीने घेत असतात. त्या तेथे स्वतंत्रपणे निर्माण झालेल्या नसतात. त्या तेथे स्वतंत्रपणे निर्माण झाल्या असत्या तर त्यांच्यात सुस्पष्ट वेगळेपण आढळले असते. कलाविषयक बदल प्रथम वरच्या वर्गात तयार होतात आणि जानपदजन हे बदल केवळ उचलतात. ही उचल करताना अर्थात ते जशीच्या तशी उचल करीत नाहीत. त्यांच्या त्यांच्या मगदुराप्रमाणे ते उचल करतात त्यामुळे ऐतिहासिक विकासात्मक असे हे मूळचे बदल लोककलात परावर्तित होतात केव्हाही मूळच्या शुद्ध स्वरूपात परावर्तित होत नाहीत, त्यातला काही भाग गाळला जातो, काहीचे स्वरूप बदलून जाते. लोककलांच्या कलाप्रवाहात सलगपणा आढळत नाही, त्यात खंडितता आणि तुटकपणा आढळतात याचे स्पष्टीकरण यात आहे. लोककला वरच्या कलांकडून जशास तशी उसनवारी करू शकत नसल्याने त्यात शैलीतील बदलांचा सुस्पष्टपणा आढळत नाही. परिणामी ही कला प्रारंभापासून शेवटपर्यंत एकाच प्रकारची राहिली आहे असा आभास तिच्या बाबतीत होतो. "लोकगीते शतकानुशतके कोठलाही बदल न घडता जशीच्या तशी राहात असतात." हा लोकगीतांच्या संबंधीचा प्रवाद खोटा आहे असे जे लोकगीतांच्या बाबतीत म्हणतात ते लोकगीतांप्रमाणेच लोककलांच्या इतरही शाखांस लागू आहे. लोककलांच्या एकूण ठशाकडे पाहता त्यात अनेकदा इतिहासाच्या ठिकाणी न आढळणारा कालातीतपणा आढळतो. पण हा काला-



अनुक्रमणिका

तोतपणा फसवा आहे. याही कलाप्रकारात इतर उच्च आणि शहरी कलाप्रकारांप्रमाणेच बदल घडत असतात. पण ते इतक्या सूक्ष्म स्वरूपात असतात की मुद्दाम व प्रयत्नपूर्वकच पाहू गेल्यास आपल्या दृष्टिला ते जाणवतात. पण सौम्य किंवा तीव्र, स्थित्यंतर ते स्थित्यंतरच ! आणि ऐतिहासिकता – काळाबरोबरचे परिवर्तन – हाच त्यांचाही गुणधर्म आहे.

लोककलेला इतिहास नाही असे जसे म्हटले जाते तशाच प्रकारे लोककलांमध्ये शैली नसतात असेही लोककलांविषयी म्हटले जाते. लोककलांमध्ये ठळक शैलिचा अभाव असतो ही गोष्ट खरीच आहे. कारण लोककलांचे खुद्द कलावंतच शैली वगैरे प्रकरणाविषयी बेफिकिर असतात. त्यांची सगळी कला उसनवारीवर, नक्कल करण्यावर अवलंबून असल्याने आणि ही उसनवारी व नक्कल ते जाणीवपूर्वक, प्रयत्न करून करीत नसल्याने शैलिचा ठळकपणा त्यात येत नाही. येणे शक्यही नाही. शैलिशी त्याना मुळी कर्तव्यच नसते. ते इतर कलांमधील त्याना जेवढे जमते, समजते, पटकन उचलता येते तेवढे घेतात. बाकीच्या गोष्टी सोडून देतात. त्या जणू त्यांच्या लेखी अस्तित्वातच नसतात. त्यामुळे लोककला कलावंतांच्या शैलित अनेक कलांचे मिश्रण आढळते. दुसरे असे की त्यांच्या आवडीमध्येही जाणिवपूर्वक चिकित्सेचा अभाव असतो. सहजासहजी जे त्यांच्या हाती पडले ते त्यानी घेतले असे त्यांच्या बाबतीत घडते. कोठल्याही बाबतीत नक्कल करताना ते फक्त एक काळजी घेतात. ज्याची नक्कल करायची ते त्यांच्या आवाक्यातील असावे लागते. मगच ते त्याची नक्कल करावयास धजावतात. लोककलांच्या कलाकृतीत आढळणाऱ्या "शैलिविषयक गोंधळांचे" तिसरे कारण असे की जानपदजन हे वृत्तीने कर्मठ व कडवे परंपराभिमानी असल्याने जुने सोडावयास ते सहजासहजी तयार होत नाहीत. त्यामुळे त्यांच्या सगळ्या कलात्मक उत्पादनात हेच नव्या–जुन्याचे अपूर्व मिश्रण दृष्टोत्पत्तीस येते. "शैलिविषयक गोंधळाचे" चवथे कारण असे की लोककलात होणारी उच्चकलांची नक्कल ही नेहमी वरवरची, दर्शनी अंगाची किंवा पृष्ठभागाची नक्कल असते. उच्चस्तरीय कलाकृतीत जे काही सखोल, रसिकाच्या गाभ्याला पोचणारे असते त्याच्यापर्यंत त्यांची आकलनशक्ती जातच नाही. लोककलेतले कलावंत खोलात कधी शिरतच नाहीत. खोलात शिरण्यासाठी किंवा अधिक कष्टप्रद कामाची नक्कल करण्यासाठी जी जिद्द, हौस आणि वृत्ती माणसाच्या अंगी असावी लागते ती त्यांच्यापाशी नाही. एखाद्या कलेत आपण अधिक प्राविण्य मिळवावे किंवा एखाद्या शैलिचा विशेष अभ्यास करावा असे त्याना फारसे वाटत नाही. आणि कदाचित वाटत असले तरी त्या वाटण्याचा फारसा पाठपुरावा करण्याच्या मनःस्थितीत ते नसतात. म्हणून लोककलांतील शैलिचे वर्गीकरण करता येत नाही. लोकसंगीतामध्ये आढळणाऱ्या याच शैलिविषयक गोंधळाला उद्देशून

एक विद्वान म्हणतात की संगीतामध्ये काही एक व्यवस्था आणि मेळ यावा म्हणून जरी या संगीताचे संगीतज्ञ प्रयत्न करीत असले तरी लोकसंगीत हो संगीताच्या अनेक शैलिंची खिचडीच शेवटी उरते. तथापि एक गोष्ट येथे स्पष्ट करावयास हवी. ती ही की शैलिविषयक मिश्रण केवळ लोककला याच काही कलेच्या वर्गात आढळते असे नाही. कलेचे दुसरेही वर्ग त्याच दोषात कमीजास्त प्रमाणात सहभागी आहेत. कोठल्याच कलावर्गात विशुद्ध कलाशैली आढळत नाहीत. मग तो कलावर्ग उच्चस्तरीय कलेचा असो वा मध्यमवर्गीय कलेचा असो. कोठल्याही विशिष्ट कालखंडातील उच्च वा मध्यम वा इतर कलाविष्काराची एक परंपरा तुम्ही घेतली आणि काळजीपूर्वक तिचे पृथक्करण केले तर अनेक भिन्नभिन्न काल-खंडातील कलापरंपरातून उचललेल्या वेगवेगळचा कलाशैलीतून ती उदय पावली आहे असे तुमच्या निदर्शनास येईल. याचे कारण असे की जे ढंग नवीन शैलित एकजीव होतात त्यांचे अस्तित्व त्या शैलित लोप पावते. पण इतर जे ढंग तितके एकजीव होत नाहीत ते उठून स्वतःच्या स्वतंत्र अस्तित्वाने बाहेर दिसत राहतात. इतर कलावर्ग आणि लोककलेचा वर्ग या दोहोत या बाबतीत फरक इतकाच की याही बाबतीत लोककलेची स्थिती थोडी अधिक एकांतिकतेची असते एवढेच ! इतर कलावर्ग वेगवेगळचा कलाढंगांचे स्वतःमधील अस्तित्व इतक्या पृथक्पणे व ढोवळपणे वागवित नसतात. लोककला ते तसे वागवितात.

तर सांगायची गोष्ट ही की लोककलेचा इतिहास कदाचित लिहिता आला तरी लोककला अनादी आणि कालातीत असतात; लोककलेमध्ये काही एक चिरंतनत्व आढळते वगैरे बडबड ही पोकळ असते. लोककलांचा प्रारंभ कदाचित फार फार प्राचीन काळापासून झाला असेल. पण तरिही मानवजातीच्या इति-हासाचा आद्य उगम लोककलेच्या आद्य उगमात असतो व प्रत्येक देशाच्या राष्ट्रीय वाङ्मयाचाही आद्यउगम त्या देशाच्या लोकवाङ्मयात असतो असे म्हणता येणार नाही, या प्रकारची विधाने कधी सिद्ध झालेली नसतात व सिद्ध करताही येण्यासारखी नसतात. या प्रकारची विधाने करणारे लोक प्रथम सिद्धांत, मागाहून पुरावा या प्रकारे वागतात. वर आपण हे पाहिलेच की लोककला या अभिधानाखाली येणाऱ्या कलाभिव्यक्तिचा निःसंदिग्ध काळ आपणास ठरविता येत नाही. तसेच लोककला या वरच्या वर्गातील कलांच्या अनुकरणातून, उसन-वारीतून वगैरे निर्माण होतात. त्यांचे निश्चित कर्तेपणही आपणास ठरविता येत नाही. या विविध अडचणी विचारात घेता राष्ट्रीय इतिहासाचा उगम त्या राष्ट्राच्या लोककलात असतो वगैरे मते पुराव्यानिशी सिद्ध करता येऊ शकत नाहीत. पण होते काय की असे सिद्धांत मांडणारी मंडळी स्वतःच प्रथम काहीएका कलाभिव्यक्तींस आदिम, अनादी, अतिप्राचीन वगैरे विशेषणे लावतात व मागाहून त्याच विशेषणांची आणि त्या विशेषणानी मंडीत कलाभिव्यक्तींची साक्ष काढून

हा पाहा या राष्ट्राच्या इतिहासाचा प्रारंभ. ही या राष्ट्राची आद्यतम कला. या कलेच्या पाठीमागे आपणास जाता येत नाही. म्हणून या राष्ट्रापुरती ही त्या राष्ट्राच्या इतिहासाची साधने, म्हणून त्या राष्ट्राच्या इतिहासाची सुरवात येथून झाली आहे वगैरे बोलत राहतात. वास्तविक कलेचा नव्हे तर इतिहासशास्त्राचाही हा विपर्यास असतो. मुळात लोककला हा कलावर्गच अत्यंत परंपराभिमानी व परंपरांविषयी अंधभक्ती बाळगणारा असल्याने आणि अबौद्धिकाचा नि अतार्किकपणाचा या कलाप्रकारातला अंशही चांगलाच जबरदस्त असल्याने जेव्हा रोमँटिकवादाची चलती असते व मनुष्ये त्यांच्या राष्ट्राचा भव्य आणि उदात्त गतेतिहास वगैरेंच्या गोष्टी उच्चरवात करीत असतात तेव्हा त्या तसल्या क्रांतीविरोधी कालखंडात लोककलांचा उदोउदो केला गेल्यास आणि लोककलाना मानवजातीची आद्यतन मापा ठरविली गेल्यास कोणासही त्याचे आश्चर्य वाटावयास नको.

कलाभिव्यक्तींचे सर्वच्या सर्व जुने नमुने चित्रकलेच्या क्षेत्रातले आहेत. काव्य हा कलाप्रकार नंतर बऱ्याच काळाने येतो. आणि काव्यांच्या त्या नमुन्यावरून त्या काव्याचा कालखंड निश्चित करता येत नाही. दृक्कलेचे जे प्राचीन नमुने आज उपलब्ध आहेत ते पूर्वपाषाणयुगातले आणि गुहाचित्रांच्या स्वरूपातले आहेत. त्यांच्या बाबतीतली सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की ही गुहाचित्रे निसर्गचित्रणे आणि वास्तवचित्रणे आहेत. निसर्गचित्रण आणि वास्तववादी चित्रण हे दोन्ही कलात्मक विशेष लोककलेचे विशेष नव्हतच. आजवरच्या लोककलेच्या नमुन्यांशी वा लोककलेतल्या ठळक नि लोकप्रिय कल्पनाबंधांशी या दोनापैकी एकही विशेष जमत नाही. उत्तरपाषाणयुगाशी आपण आलो की मग लोककला या अभिधानास पात्र होणाऱ्या कलाभिव्यक्तींचे दर्शन आपणास घडते. पण येथेही काव्य वगैरे कलाभिव्यक्ती प्रथम आढळत नाहीत. तर गृहोपयोगी सामान निर्माण करणे हीच येथीलही प्रारंभिची कला आहे. याचा अर्थ असा होतो की गृहोपयोगी वस्तु-उत्पादनात या कलांचा उगम होता. या विशिष्ट कलाढंगाविषयी ढंग म्हणून फारशी माहिती मिळत नाही. आणि जी काही माहिती मिळते ती या काळातल्या मातकामावरून ( पॉटरी ) मिळते. आणि त्यातही कलाविषयक जे दोन घटक प्रामुख्याने आढळतात ते नैसर्गिक आकृत्यांच्या घटकांची फिरवाफिरव करून तयार केलेल्या नवीन आकृत्यांचेच. म्हणजेच रचनाविघटन आणि रचना-नवसंयोजन हे होत. कलाकृतीत किंवा रेखाटनात नैसर्गिक आकृत्या न घेता नैसर्गिक आकृत्यांच्या आधारे तयार केलेल्या अलंकरणात्मक, कृत्रिम आकृत्यांचे छापे ( डिझाईन ) चित्रकलेत वापरण्याची ही प्रथा नंतरच्याही कालखंडात सुरू राहिल्याचे दिसून येते. वास्तविक तसे होणा नवे होते. जीवनरहाटी बदलताच कलेचा ढंगही बदलत असतो. पण तसे झाले आहे एवढे खरे. उत्तरपाषाणयुगीन

कालखंडात आढळणारे अलंकरणाचे कित्येक कल्पनाबंध व ठसे पुढीलही काल-खंडात सुरू राहिले. पूर्वपाषाणयुगात ( पाषाणयुगाच्या आधी ) मनुष्ये मृगया व कंदमुळे-फलाहार इत्यादींवर गुजराण करीत. उत्तरपाषाणयुगात ही जीवन-रहाटी जाऊन तिच्या जागी शेतीव्यवसाय व गोपालन यावर उदरनिर्वाह करणारी जीवनरहाटी आली होती. त्यामुळें नैसर्गिक आकृत्यांऐवजी नैसर्गिक आकृत्यांतच फिरवाफिरव करून तयार केली गेलेली अलंकारिक आकृत्यांवर आधारीत नवी कलाशैली येणे शक्य होते. कारण या व्यवसायात शिस्तबद्धता होती. काही योजना होती. ती अगदीच निसर्गावस्था नव्हती. साहजिकच आता निसर्गा-बरोबरचा संबंध कमी होऊन जीवन काहीसे कृत्रिम बनले होते. म्हणून चित्र-कलेतील आकृतिबंधही अलंकरणात्मक, कृत्रिम, अनैसर्गिक झाले. पण कलेत वेल-बुट्या, कृत्रिम अलंकरण का आले याचे हे स्पष्टीकरण उत्तर-पाषाणयुगीन कलेपुरते ठीक आहे. परंतु उत्तरपाषाणयुगानंतरच्याही युगात जव्हा याच प्रकारचे कला–ठसे आढळतात तेव्हा त्याना हे स्पष्टीकरण लागू करता येत नाही. निदान पुरेसे लागू करता येंत नाही. तर या नव्या शैलिची ही अभंगता हे एक बौद्धिक गूढच राहते. या विषयातील पंडित असे सांगतात की लोककलेच्या आविष्कारात त्याना हजार वर्षे कायमपणे टिकलेले आकृतिबंध गवसले आहेत. पंडित या आकृतिबंधांचे नाते उत्तर-पाषाणयुगातील भौमितिक कला-शैलिशी लावू पाहतात. पण त्यांचा हा केवळ तर्क आहे, तो सिद्ध झालेला नाही. उत्तरपाषाणयुगीन संस्कृती जशी किसान-संस्कृती होती तशाच प्रकारे नंतर निर्माण झालेली जानपद संस्कृतीसुद्धा प्रामुख्याने किसानांचीच संस्कृती होती. त्यामुळे या दोन संस्कृतीतील कलाविष्कारात काही कल्पनाबंध व आकृतिबंध समान असणे शक्य आहे. पण दोन संस्कृतीतील काही कलात्मक कल्पनाबंध व आकृतिबंध समान आहेत असे म्हणणे वेगळे आणि एकच कलात्मक शैली अनेक संस्कृतींमध्ये ( एक हजार वर्षे ) कायम टिकून होती असे म्हणणे वेगळे. दुसरी गोष्ट प्राय: अशक्य असते. तेव्हा सांगायची गोष्ट अशी की कलाविष्काराची भौमितिक शैली उत्तरपाषाणयुगापासून सुरू होऊन उत्तर-पाषाणयुग उलटून गेले तरी कित्येक हजार वर्षेपर्यंत टिकून होती हे मत ग्राह्य होण्यासारखे नाही. कलात्मक आविष्कारांची अशी परंपरा टिकत नाही. अशी परंपरा गृहित धरणे म्हणजे एवढ्या लांबलचक कालखंडात जे काही ऐतिहासिक, सामाजिक वगैरे बदल घडून आले असतील ते तसे घडून आलेच नाहीत असे मानण्यासारखे आहे. उत्तर-पाषाणयुगातले कित्येक कलात्मक आकृतिबंध व कल्पनाबंध पुढेही खूप वर्षे चालू होते याला कारण कलात्मक आविष्काराची एक परंपरा इतका दीर्घकाळ टिकून होती किंवा मानवी स्वभाव अपरिवर्तनीय आहे हे नव्हे. कलात्मक आविष्काराचा हा विशिष्ट ठसा उत्तर-पाषाणयुग संपले तरी टिकून राहण्याचे कारण



अनुक्रमणिका

हे की ती जी संस्कृती होती ती प्रामुख्याने किसान संस्कृतीच राहिली होती. किसान-समाज वगळल्यास इतर समाज ऐतिहासिक स्थित्यंतर घडताच त्या स्थित्यंतराबरोबरच बदलत असतात. किसान हाच एक समाज असा असतो की ज्याची जीवनरहाटी दीर्घ काळपर्यंत न बदलता कायम टिकून राहाते. आणि तशी ती येथे टिकून राहिल्याने ती कलाही बऱ्याच प्रमाणात जुने साम्य टिकवून राहात होती. बाकी भवतालचा सर्व समाज कोठेही जावो किसान–समाज हे स्वतःच्या अशा वैशिष्ठ्यपूर्ण मंदगतीने पुढे पुढे चाललेले असतात. जणू काही इतिहासाचा परिणाम त्यांच्यावर होतच नाही. इतर समाजात पैशाच्या व्यवहाराचा प्रकार बदलला की त्या समाजाचे वरचे सगळे स्वरूप बदलते. किंवा नवीन प्रकारचे तंत्रवैज्ञानिक ज्ञान त्या समाजात आले की त्यांचा मूलभूत साचा बदलतो व त्या साच्याबरोबर त्यांचे विचार, कला हेही वरच्या थराचे सर्व संस्कृतिक आविष्कार बदलतात. ( उदा० समजा, एखाद्या समाजाचा, सगळा आर्थिक व्यवहार वस्तूंच्या प्रत्यक्ष अदलाबदलीतून होत असेल; थोडक्यात, तंत्रवैज्ञानिक-दृष्ट्या तो सगळा समाज अगदी खालच्या टप्प्यावर असेल तर त्या समाजाची वैचारिक घाटणी कलाविष्कार–सांस्कृतिक आविष्कार ज्या प्रकारचा असेल त्यापेक्षा वेगळा सांस्कृतिक आविष्कार–जर तोच समाज भांडवलशाहीत रूपांतरित झाला तर असेल.) किसान–समाज या बाबतीत साधारणतः स्थिर व अपरिवर्तनशील असतात, म्हणून आजूबाजूच्या सामाजिक थरांचे आर्थिक स्वरूप बदलले, तेथे नवीन प्रकारचे तंत्रविज्ञान आले तरी त्याचा फारसा परिणाम किसानांवर होत नाही. म्हणून काहीतरी जबरदस्त धक्का किसान–समाजाला बसेपर्यंत व अंतर्बाह्य तो समाज बदलेपर्यंत त्या समाजाचे सांस्कृतिक आविष्कार पिढ्यानपिढ्या एक-सारखे राहतात, तात्पर्य, उत्तरपाषाणयुगाच्या नंतरही हजारो वर्षेपर्यंत काही समाजात पहिलेच कलात्मक व सांस्कृतिक आविष्कार कायम टिकून होते याचे कारण हे समाज प्रामुख्याने शेतकरी पेशाचे राहिले होते, त्यातील आर्थिक व्यवहारांची घाटणी, किंवा तंत्रविज्ञानाचा वापर यात खोल असा काहीच बदल घडला नव्हता आणि त्यांच्या जीवनाची घाटणी आणि तंत्रविज्ञानाचा वापर कायम राहिल्याने त्यांचे कलात्मक व सांस्कृतिक आविष्कारही फारसे न बदलता पूर्वीसारखेच कायम राहिले होते.

सजावटीची भौमितिक शैली उत्तरपाषाणयुगीन शैलित मोडते. ख्रि. पू. ५०० ते ख्रिस्तोत्तर ५०० या दीर्घ कालावधित याच कलाघाटणीचा प्रभाव होता. ग्रीक निसर्गवाद आणि अभिजातवाद यांचा उदय होईस्तवर कलाक्षेत्रात याच कला-घाटणीचा प्रभाव आढळतो. तथापी या घाटणीत कुठल्याही प्रकारची प्रगती किंवा विकास असा मात्र बराच काळ दिसत नाही. ताम्रयुगाच्या उदयानंतर मात्र असा फरक किंवा ज्याला आपण बदल म्हणू तो फरक वा बदल दिसू

लागतो. ब्रॉंझयुगाच्या उदयानंतर तत्कालिन समाजात अनेक सामाजिक स्थित्यंतरे घडून आली. — समाजात सामंत आणि त्यांचा आश्रितवर्ग अशी वर्गवारी पूर्वीपासून होती. पण त्यांच्यातला फरक फारसा ठळक नसे. ब्रॉंझयुगाच्या उदयानंतर हे फरक ठळक झाले. लढाऊ शिलेदारी बाण्याच्या वरिष्ठ वर्गाला समाजामध्ये महत्त्व प्राप्त झाले. सामंतशाहीच्या जन्माला प्रारंभ झाला. राजेशाहींचा उदय झाला. समाजातील निरनिराळ्या वर्गातील फरक काटे-कोर होणे, सामंतशाही व राजेशाही यांचा उदय होणे या तीनचार घटनांचा जबरदस्त परिणाम तत्कालिन कलात्मक आविष्कार घडून आला. ही युगे धातुकामाची युगे होती. आणि त्यांची सगळी कला लढाईचे सामान आणि खाजगी अलंकार यांच्याच उत्पादनापुरती मर्यादित होती. या दोन्ही वस्तू वरिष्ठ वर्गापुरत्या मर्यादित असल्याने या कलेवर जो ठसा होता तो वरिष्ठ वर्गाच्या आवडीनिवडींचा होता. अर्थात उत्तरपाषाणयुगीन किसानकलाघाटाचा ठसाही या कलेवर होता. पण उत्तरपाषाणयुगीन किसान कलाघाटाचा प्रभाव फारसा खोल होता असे मात्र या कलेच्या बाबतीत म्हणता येणार नाही. एकतर ही कला हौशी लोकांच्या हातात नव्हती. ती धंदेवाईक कसबी कारागिरांच्या व कलावंतांच्या हाती होती. हे कसबी कारागिर व कलावंत वरच्या वर्गासाठी कलोत्पादन करीत होते. म्हणून वरच्या वर्गाच्या आवडीनिवडी त्यांच्या कलेत प्रतिबिंबित होत होत्या. अशा परिस्थितीत मुद्दाम आडमार्गाला जाऊन उत्तर-पाषाणयुगीन किसान कलाधाट सांभाळण्यासाठी त्यांनी काही धडपड केली असेलसे वाटत नाही. दुसरी गोष्ट अशी की वरिष्ठ शहरीवर्ग आणि ग्रामीण किसान-वर्ग यांच्यात आता प्रादेशिकच अंतर निर्माण झाले होते. मेसापोटेमिया व इजिप्तमधल्या किसानवसाहती उत्तरपाषाणयुगीन काळापासूनच शहरी वस्त्यांपासून दूर होऊ लागल्या होत्या. वेगळ्या प्रकारचा जीवनमार्ग अनुसरित होत्या. स्वतःला लागणाऱ्या गृहोपयोगी वस्तू स्वतःच स्वतःच्या कारागिरांकडून व कलावंतांकडून बनवित होत्या. शहरी वस्त्या या किसान वस्त्यांपासून दूर अंतरावर वसत गेल्याने किसानांची कला त्या शहरी वस्त्यांच्या कलेवर स्वतःचा प्रभाव फारसा पाडू शकत नव्हती. आणि कालांतराने हा प्रभाव जवळजवळ अस्तंगप्रायच झाला. तथापी उत्तरपाषाणयुगीन कलेचा एक विशेष मात्र पुढेही बराच काळपर्यंत चालू राहिला. विशेषतः पौर्वात्य कलाविष्कारात. हा विशेष म्हणजे आकारवादाचे कलानिर्मितीतील महत्व. उत्तरपाषाणयुगीन कलेत कलाविषयाच्या बाह्य आकाराला फार महत्व असे. कला शक्यतो बाह्य, नैसर्गिक आकाराशी प्रामाणिक ठेवण्याकडे त्या कलावंतांचा ओढा असे. हे कलावंत कलोत्पादन करताना मुख्यत्वेकरून आकाराच्या तत्त्वाला सर्वांत जास्त महत्त्व देत. आकाराच्या तत्त्वाला कलानिर्मितीत महत्व देण्याचे हेच सूत्र प्राचीन पौर्वात्य नागरसंस्कृतीत

त्या संस्कृतीच्या अंतिम पर्वापर्यंत कायम टिकलेले आढळते. ग्रीकसंस्कृतीच्या भरभराटीनंतरच ग्रीक उच्चस्तरीय कलाविष्कारातून ते शेवटी अदृश्य पावले. मग मात्र आकारवादाच्या तत्त्वाची उच्च नागरकलेच्या प्रांतातून पिछेहाट झाली नि पुढील अनेक शतके कलेच्या प्रांतात आकारवाद आढळेनासा झाला.

खि. पू. ९०० ते ७०० च्या दरम्यान ग्रीक भौमितिक कलाढंग वहरात आला. ग्रीकांचा भौमितिक कलाढंग आणि उत्तरपाषाणयुगातील अलंकारिक आकृतिरेखाटनाचा ढंग यात वरीच साम्ये दाखविता येतील. उत्तरपाषाणयुगात कलेत रेखाटनाचे कित्येक नमुने जसे गोफ विणण्याच्या किंवा वेतकामाच्या वगैरे नक्षीकामावरून घेण्यात येत असत तसेच ते आताच्या या ग्रीक भौमितिक रेखाटनात घेण्यात आले होते. उत्तरपाषाणयुगीन कलारेखाटनात नैसर्गिक आकृतिच्या आकाररेखांना कृत्रिम वळणे देऊन किंवा त्यानाच वेडेवाकडे काल्पनिक आकार देऊन नवीन आकार तयार केले जात तसेच येथेही केले जात होते. उत्तरपाषाणयुगीन रेखाटन जसे निर्जिव आणि कडक रेखांचे असे तसेच ते आताच्या ग्रीक भौमितिक कलेतही होते. ग्रीकातीलच आयोनियन या संस्कृतीशी तुलना करता ग्रीक द्विपकल्पाच्या मुख्य भागावरील संस्कृती प्रायः किसान प्रकारचीच होती. तथापी ग्रीक कलानमुन्यांपैकी डिपिलॉन कुंभ ( व्हेझ ) नावाने प्रसिद्ध असणारे कुंभारकाम की ज्यातही भौमितिक नक्षीचा वापर केला गेला होता ते डिपिलॉन कुंभनामक मातकाम मात्र किसानकलावर्गात मोडणारे नाही. डिपिलॉन कुंभाचे मातकाम कलात्मकदृष्ट्या इतक्या वरच्या दर्जाचे होते की किसान–कलावंतांना तो दर्जा कधीच गाठता आलेला नाही. डिपिलॉन कुंभावर नक्षीकाम करणारे कलावंत तंत्रदृष्ट्या तर अत्यंत प्रगत होते परंतु त्यांची कलात्मक अभिरुचीही अत्यंत समृद्ध आणि सुधारलेली होती. अशी अभिरुची आणि तंत्रकौशल्य किसानवर्गात आढळत नाही. डिपिलॉन कुंभांचे रंगकाम तर अप्रतिम नव्हे अपूर्व असेच आहे. डिपिलॉन कुंभकामाचे हे विशेष लक्षात घेता डिपिलॉन कुंभकामाचे कलावंत आणि ग्राहक किसानवर्गातील असतीलसे वाटत नाही. ग्रीक कुंभ व नक्षीकामाची कला उत्तरोत्तर फोफावत गेली आणि काही काळाने ग्रीक संस्कृतीचा तो एक मोठा उच्चभ्रू प्रकारचा कलाव्यवसायच बनला. ग्रीक अभिजात कलोत्पादनाच्या कालखंडात तर ही कला आणि किसानवर्गाची कला यात काही संबंधदेखिल उरला नाही. डिपिलॉन कुंभ आणि नक्षीकामाची कला एकीकडे फोफावत होती म्हणून ग्रामीण जनतेने स्वतःचे कुंभकाम व नक्षीकाम बंद केले होते असे नाही. किसानवर्ग आपापल्या वकुबाच्या मर्यादेत स्वतःच्या उपयोगाची मातीची भांडी वगैरे तयार करीतच होता आणि आपापल्या मगदुराप्रमाणे व हौसेप्रमाणे त्यावर नक्षीकामही करीत होता. तेव्हा ग्रीक ग्रामीण जनतेने तिच्या वैयक्तिक मर्यादात कुंभारकाम म

मातकामही सुरू ठेवले असणार आणि तिची स्वतःची अशी जी भौमितिक कला-रेखाटनाची परंपरा होती तीही जिवंत ठेवलेली असणार यात शंका नाही.

पुढे युरोपमध्ये स्थलांतरांचे युग आले. आणि अनेक मानवसमूह आपापली मूळ वसतीस्थाने सोडून मोठ्या संख्येने दुसऱ्या वसतीस्थानाकडे येऊजाऊ लागले. युरोपच्या इतिहासात या कालखंडाला **स्थलांतरांचे युग** असेच नाव आहे. असो. पण **स्थलांतरांचे युग** उजाडेस्तवर आणि ग्रामीण मानवसमूह मोठ्या संख्येने एकिकडून निघून दुसरीकडे स्थायिक होईस्तवर लोककलांचा वरच्यापेक्षा अधिक प्रभाव उच्चस्तरीय कलांवर पडलेला नाही. उच्चस्तरीय कलानी त्यांच्याकडून काही घेतलेले नाही वा काही गिरविलेलेही नाही, स्थलांतरांच्या कालखंडात मात्र या धाटणीचा प्रभाव निश्चितपणे दिसून येतो. आणि तळाशी उगम पावलेल्या कलात्मक प्रवृत्तींचा वरच्या वर्गातल्या कलाप्रवाहावरचा परिणाम जाणवतो. खालच्या वर्गातल्या कलेच्या परिणामाचे पडसाद वरच्या वर्गातील कलेत दिसणारे पाश्चात्य कलाइतिहासातले स्थलांतरांचे युग हे कदाचित एकमेव युग असावे. किंबहुना ह्या स्थलांतरांनी कलेच्या प्रांतात एका नवीनच परंपरेला चालना दिली असेही त्यांच्याविषयी म्हणता येईल. तथापी असे जे काही लोक म्हणतात की नायरी संस्कृतींचा ऱ्हास झाला की " निरागस, निष्पाप, ज्याना उच्चभ्रू संस्कृतीचा वाराही लागलेला नसतो अशा **' यौवनपूर्ण '** ग्रामपदजनांच्या " संस्कृतींकडून त्यांचे पुनरुज्जीवन घडून येते ते मात्र बहुतांशी खोटे आहे. अशा लोकांच्या या म्हणण्यात " निसर्गावस्थेविषयीच्या " काव्यमय उत्साहापेक्षा अधिक काहीच असत नाही. म्हणून ग्रीकांच्या मायसिनियन संस्कृतीचा ऱ्हास झाल्यानंतर **डिपिलॉन** कलाढंगाने हेलेनिक कलेला स्फूर्ती दिली व हेलेनिक कलाढंगाचा उगम डिपिलॉन कलापरंपरेत आहे असे जे म्हणणे आपण ऐकतो ते केवळ कल्पनारंजन असते. कारण हेलेनिक ढंगाचे साम्य लोककलेशी असो अथवा नसो, पण कोठल्याही परिस्थितीत हेलेनिक कलेचा उगम या ढंगात नाही. तो नंतरच्या " आर्ष " ( Archaic ) ढंगात आहे. डिपिलॉन कलेत जो भौमितिक भाग आहे त्याचा चेहरामोहरा आणि चलनवलन पौर्वात्यांच्या आणि प्रागैतिहासिक पद्धतीचे आहे. तर उलट हेलेनिक कला ही पाश्चात्य घाटाची, चेहऱ्यामोहोऱ्याची असून तिचा हा पाश्चात्यपणा काही वेगळ्याच तीनचार घटकात आहे. एक तर ही नवी कला फारशी अमूर्तपणाची नसून ती अधिक भरीवपणाची आहे. उठावदार ठसठशीतपणा तीत दिसतो. आणि दोन, ती निसर्गवादी, नैसर्गिक आकृतिरेखाट-नाला महत्व देणारी आहे. आता रेखाटनाचा व आकृतींचा भरीवपणा नि ठसठशितपणा व नैसर्गिकपणा हे जे कलेचे विशेष आहेत ते भूमितिवादाचा प्रभाव संपुष्टात आल्यावर निर्माण होतात. **स्थलांतरांच्या** भौतिकवादी

ढंगाचा मध्ययुगीन आणि नवकलेशी जो संबंध आहे तो अगदीच वेगळ्या धर्तीचा आहे.

ख्रिस्ती धार्मिक कला प्राचीन अभिजात कलेपेक्षा मुख्यत्वेकरून दोन बाबतींत वेगळी असते. एक, तीत आलेला विषय आणि दोन, विषय रेखाटण्याच्या बाबतींतील तिच्या शैलिची स्वतंत्रता. यातील विषयापुरते बोलायचे झाल्यास असे म्हणता येईल की विषय महाकाव्याचा असतो. म्हणजे महामानवाचे अवतरण, त्याचे बालपण, त्याचे मोठे होणे, त्याच्यावरील संकटे, त्याची साहसे व पराक्रम आणि त्याचे दिव्यत्व, थोडक्यात, त्याचा जीवनवृत्तांत हा त्या कलेचा विषय असतो. किंवा ख्रिस्ती कलेत मनाच्या स्थितीचे चित्रण असते. ख्रिस्ती धार्मिक कलेचा दुसरा विशेष म्हणजे त्या कलेची आकारवाचक रचना. ही रचना अपरिहार्यपणे एक वेगळ्याच प्रकारची स्वतंत्रता दाखविते. आणि त्यामुळे या कलेला रेखाटनाची एक आगळी, अमूर्त सुंदरता प्राप्त झाली आहे. महाकाव्य विषयाच्या हाताळणीपुरतेच बोलायचे तर असे म्हणता येईल की, अभिजात कलेनंतरच्या पश्चात–अभिजात कलेचा रोमन कलाव्यापाराशी असणारा संबंध अगदी स्पष्ट आहे. तुम्ही फक्त ट्रोजनच्या स्तंभासारख्या रोमन कलानमुन्याची तुलना एकीकडे आधीच्या अभिजात कलानमुन्यांशी आणि दुसरीकडे बायबल कथाना मध्ययुगात दिलेल्या कलात्मक हाताळणिशी करा, की नवीन कलात्मक दृष्टीला चालना देणाऱ्या ख्रिस्ती धार्मिक कलेतील क्रांतिकारक बदलाचा उगम अख्रिस्ती रोमन कलेच्या ठिकाणी होता हे तुमच्या ध्यानात येईल. ऐतिहासिक प्रसंग चित्रकलेत चित्रित करण्याची प्रथा रोमन लोकानी पाडली यात कोठलिच शंका नाही. आता गंमत अशी आहे की दृक्कलाचित्रणात आढळून येणारी महाकाव्य कल्पनाबंधाची हाताळणी किंवा भावदिग्दर्शनाचा प्रयत्न यापैकी एकाचाही प्रारंभ लोककलात असत नाही. तो असतो बहुजनसमाजाच्या लौकिक प्रकारच्या कलात. रोमन बादशहा ऑगस्टस नंतरच्या कालखंडात चालू घटनांची माहिती लोकाना व्हावी म्हणून त्या घटनांची चित्रे काढून ती लोकांसमोर ठेवण्याची रीत होती. आणि चालू घटना बहुजनसमाजाच्या निदर्शनास आणण्यात चित्रकलेने केवढी मोठी कामगिरी बजाविली आहे हे तर सर्वज्ञातच आहे. चित्रकला ही तेव्हा जनतेची कला बनली. जनतेशी जनतेच्या भाषेत संवाद करू शकणारी सामान्यांची कला. चित्रकलेशी तुलना करता शिल्पकला ही नेहमीच अभिजात कला राहिली. ती कधीच बहुजनसमाजाची, लोकांची कला बनली नाही. चित्रकला केवळ सामान्यांची, लोकांचीच कला नव्हती. ती फार मोठ्या•प्रमाणावर उत्पादित होणारी कला होती. जुन्या यशस्वी युद्धमोहिमांची माहिती करून देणारी पोस्टर्स त्या काळी चित्रित केली जात आणि रस्त्यातून त्यांची विजयी मिरवणूक काढीत. एखादी कृती ही गुन्हा

आहे हे दाखविणारी चित्रें काढून ती न्यायालयात लावली जात. आरोपीचा निरपराधीपणा दाखविणारी चित्रे काढून त्यांचेही प्रदर्शन न्यायालयात केले जाई. देवमंदिरात परमेश्वराला भेट किंवा नवसाची फेड म्हणून चित्रे दिली जात. अनेक प्रकारे चित्रकलेचा व चित्रांचा उपयोग त्या काळी केला जाई. चित्रे दैनिक वार्ता होती. चित्रे वर्तमानपत्रातले मुख्य लेख होती. चित्रे न्यायालयीन दाखले होती. जाहिरात होती. माहितीलेखन होती. चित्रमय वर्तमानपत्र होती. फिल्म—नाटय होती. चित्रे सर्व काही होती. आज कसे आपण चित्रवाणी, दूर-चित्रवाणी किंवा चित्रमय मासिके व दैनिके मोठ्या आवडीने पाहतो तशीच तेव्हाची जनता ही चित्रे मोठ्या आवडीने पाहात असे. आणि ज्या कारणांसाठी आज आपणाला चित्रमय मासिके, दूरचित्रवाणी वगैरे आवडतात त्याच कारणां-साठी तेव्हाच्याही लोकाना ग्राफिक आर्ट किंवा चित्रांची कला आवडत असे. चित्रे म्हटली की त्यांचा आशय नेहमी उघड असतो. त्यात गुंतागुंत अजिवात नसते. ती समोरासमोर बोलतात. सहज समजतात. आणि याच कारणासाठी आजही आपणाला चित्रांकित गोष्टी आवडतात. तेव्हाच्या लोकानाही त्याच कारणासाठी ती आवडत. थोडक्यात, मनुष्याच्या ठिकाणी सचित्र रेखाटनाविषयी जी बालिश आवड असते तीच तेव्हाच्याही लोकांच्या ठिकाणी होती व त्याच बालिश आवडी-पायी त्याना हे सचित्र कार्यक्रम आवडत होते. आज जसे उच्चभ्रू लोक म्हणतात की चित्रवाणी आणि रेडिओच्या प्रसारामुळे जनतेची कलात्मक अभिरुची विघडत जाणार आहे त्याचप्रमाणे साम्राज्यशाही रोमच्या काळातील कलेचे उच्चभ्रू दर्दी म्हणत की गंभीर कलाव्यापारात शिरलेल्या चित्रांच्या या आवडीपायी लोकांची अभिरुचीच विघडून जाणार आहे. तथापी या नवीन कलेचा प्रारंभ जरी वटवटीत आणि खालच्या दर्ज्याचा होता तरी नंतरच्या ख्रिस्ती कलेच्या उगमाची बीजे याच आरंभिच्या वटवटीत आणि खालच्या दर्ज्याच्या कलेत आहेत. कलेच्या या नवीन प्रारंभात महाकाव्यातील कथानके चित्रित करण्याची जर सुरवात केली गेली नसती तर प्राचीन काळातील भव्य स्मारकांच्या प्रांतातून बाहेर पडून सचित्र हस्तलिखिते, भित्तीचित्रे, मध्ययुगीन चर्चचे चित्रांकित मंडप यातील चित्रातून दिसणारी चित्रकला कधी दृष्टीसच पडली नसती.

अभिजातवादी प्राचीन काळातल्या कलेत ज्याप्रमाणे आपणास महाकाव्या-तील विषयांचें प्रतिरूपण आढळत नाही किंवा आढळल्यास अगदीच अल्प प्रमाणा-वर आढळते तशाच प्रकारे ख्रिस्ती धार्मिक कलेतील रेषाकृतींच्या अमूर्त सौंदर्याचा व अलंकरणात्मक आकृतिरेखाटनाचा दुसराही घटक तेथे आपणास आढळत नाही. रेखाकृतींच्या अमूर्त सौंदर्याचा, आणि अलंकारिक आकृति-रेखाटनाचा घटक प्रथम स्थलांतरयुगात उदयास आला आणि तेव्हापासून पाश्चात्य कलेत तो नाही असे कधीही झालेले नाही. आयरिश मिनिएचरमध्ये

आढळणारी बारीक कलमसफाई, उत्तर रोमानेस्क कलेच्या अभिव्यक्तिवादात आढळणारे रेषांचे लाघव, लकबवादी चित्रकला, बॅरोक चित्रकला आणि रोकोको चित्रकला यातील रेखाटनाचे अप्रतिम कौशल्य, गोथिक आकृतिबंधातली वेडी-वाकडी फुगीर वळणे या सर्वात स्थलांतरकाळात विकसित झालेल्या अलंकारिक कलेचे अवशेष आणि स्मृती आढळतातच ! तेव्हा ही जी नवी कलात्मक प्रवृत्ती जन्मास येत होती तिच्या दुसऱ्या घटकाचा उगमही जनतेच्या कलेतच होता. कारण स्थलांतरांची कला पूर्णत्वाने जरी लोककला म्हणता येणार नसली तरी ती किमानजनतेची कला होती आणि तिचा आकृतिबंध, तिचे रंगरूप आणि तिचे ऐतिहासिकत्व या दोन्हो दृष्टींनी पाहता तिचे संबंध लोककलेशीच अधिक जवळचे होते. काही असो, पण या कलेची बीजें लोककलेत होती यात शंका नाही. मग तिचा शोध तुम्ही जर्मन भटक्या टोळयाना म्हणजे सर्माशिअन कला-शिक्षकाना चिकटवा किंवा मागे जात जात तो रोमन प्रॉव्हिशिअल (प्रांतिक) कलेला चिकटवा. जॉर्ज डेहिओ या तज्ज्ञाच्या मताप्रमाणे **स्थलांतरांची कला** हा कलेचा संकर होता. आणि अवाढव्य रोमन फलटणींच्या इकडून तिकडे आणि तिकडून इकडे अशा ज्या हालचाली होत असत त्या हालचालींच्या जातीय संकराच्या घालमेलीत ही कला उदयास आली होती. या कलेचे पहिले प्राचीन अवशेष जर्मन आणि स्कॅंडेनेव्हियन भूमीवर गवसले होते यात शंका नाही. परंतु नंतरचे अवशेष इटालीमध्येच गवसले होते. देहिओ यांच्या मताप्रमाणे ही कला प्रथम जर्मनीत उगम पावली व तेथून ती दक्षिणेकडे पसरली. हे प्रमेय खोडून काढावयास सबळ पुरावा वस्स आहे. कारण या कलावस्तू दक्षिणेकडून उत्तरेकडे गेल्या असल्या पाहिजेत. उत्तरेकडून दक्षिणेकडे नव्हे. माझ्या कल्पनेप्रमाणे बाजारी वस्तू किंवा शेतकरी जनतेसाठो गृहोपयोगी सामानाच्या वस्तू म्हणून खरेदीच्या रूपात या वस्तू दक्षिणेकडून रोमन साम्राज्याच्या प्रांतात गेल्या असाव्यात किंवा जर्मन सैनिकांनी केलेल्या लुटीतून त्या प्रांतिक शेतकरी वर्गापर्यंत पोचल्या असाव्यात आणि मागाहून जर्मन लोकांनी त्यांची नक्कल करता करता त्यात सुधारणा केल्या असाव्यात. स्थलांतरांची कला जर्मन उगमाची नसावी या म्हणण्याला दुसरा आधार असा की स्थलांतरांच्या कलेचा केवळ आकृतिबंध विचारात घेऊन त्या आकृतिबंधांचेच फक्त पृथक्करण करून जर त्या कलेच्या उगमासंबंधी निष्कर्ष आपण काढला तर तो निष्कर्ष रोमन प्रांतिक उगमाकडे बोट दाखवितो. रोमन प्रांतिक कलेचे उत्तर आविष्कार आपण विचारात घेतले तर त्यात आणि स्थलांतरकालिन कलेच्या नंतरच्या आविष्कारात दोहतीत महत्वाच्या बाबतीत साम्य आढळते. उदा. रोमन प्रांतिक कलेमध्ये नैसर्गिक आकारांचे जंगच्या तसे हुबेहूब चित्रण केले जात नसे. तर बाह्य आकारांचेच सामान्य रेखाटन तीत आढळते. स्थलांतर कालखंडातील कलासुद्धा



अनुक्रमणिका



अशीच नैसर्गिक आकार रेखाटनाऐवजी नैसर्गिक आकृतींच्या बाह्य रेषाना महत्व देणारी आढळते. रोमन प्रांतिक कला आणि स्थलांतरकालिक कला यात दुसरे साम्य म्हणजे पैससंबंधांच्या यथार्थ संबंधांकडे दोन्हीही कडचे दुर्लक्ष. वास्तविक नैसर्गिक आकार जाडपातळ, म्हणजे पाहताक्षणी खोली किंवा घनता दर्शविणारे असतात. रोमन प्रांतिक कलेत हे सर्व आकार सपाट पातळीत दिग्दर्शित केलेले आहेत. हीच गोष्ट म्हणजें घनता किंवा जाडी ( spatial depth ) सपाट आणि रेषात्मक प्रकारात दाखविण्याचा प्रयत्न स्थलांतरांच्या कालखंडातील कलेत आढळतो. याचा एक परिणाम म्हणजे नैसर्गिक आकृतींची घनता आणि लयबद्धता ( plastic form ) यांची चित्रकाराची जाण कमी झाली. उलट पेंटर्ली इफेक्टमध्ये. छटा दाखवून परिणाम साधण्याच्या कलेमध्ये, भर पडली. फ्रांझ विक हॉफ् यांच्या मते अभिजातवादी कलेच्या अंतिम पर्वाचे हे दोन्ही विशेष होते.

अभिजातवादी कलेचे हे " लोकशाहीकरण " रोमन प्रजासत्ताकाच्या शेवटी शेवटी सुरू झाले होते. सामान्य जानपदजनाना सामाजिक महत्व आल्याने, रोमन समाजात विदेशी आणि रानटी लोकांच्या प्रवेश झाल्याने, वरिष्ठ वर्गातील अभिजात आवडीनिवडीच्या लोकांचा सांस्कृतिक ऱ्हास झाल्याने आणि अभिजातवादी मूल्यांविषयीची सार्वत्रिक अनास्था निर्माण झाल्याने रोमन-कलाक्षेत्रात प्रांतिकीपणाचा ( रोमन प्रांतातील आवडीनिवडींशी, ठेवणीघाटणींशी संबंधित शैली व धाटणी ) शिरकाव होत गेला. अर्थात हे सर्व हळूहळू होत गेले होते. वरिष्ठ वर्गांच्या कलेवरचा प्रॉव्हिन्शिअल कलेचा परिणाम एकाएकी अकस्मात निर्माण झाला नव्हता. ती एक दुहेरी आणि समांतर कलाप्रवाहांची संथ अशी प्रक्रिया होती. एकीकडे आकृतिबंधा-विषयीची अभिजातवादी जाण आतल्या आत खंगत चालली होती. तर दुसरीकडे मूल्यांची आभिजातवादी कलात्मक आविष्कारांची जाण आतल्या आत खंगत चालली असताना लोकांची आवड प्रॉव्हिन्शिअल कलेच्या पुनरुज्जी-वनाला आणि फॅशनला उत्सुक बनत होती. येथे रोमनकला जुन्या इटालियन परंपरेकडे परत वळत होती. इटालियन परंपरा हा इट्रूस्कन लोक आणि प्रारंभिक रोमन राजसत्ताक यांचा वारसा होता आणि वारसा म्हणून अभिजात रोमन कलेचा एक घटक होता. मध्ये काही काळ रोमन कलाप्रांतात हेलेनिस्टिक कलाफॅशनचे प्राबल्य वाढले नि ही इटालिक परंपरा थोडी मागे पडली. पण आता कलाबंधविषयक अभिजातवादी जाण आतल्या आत खचत गेल्याने रोमन प्रॉव्हिन्शिअल कलापरंपरेला परत उठाव मिळाला. इटालिक कलापरंपरेचीही मुळे रोमन प्रॉव्हिन्शिअल कलापरंपरेच्या मुळांप्रमाणेच किसानांच्या संस्कृतीत होती. निरनिराळ्या कलाबंधातील हे अंतर्गत संबंध मोठे मनोवेधक असले तरी

याच्यामुळे कलेतल्या नव्या शैलीतील होकारात्मक अंगावर प्रकाश पडत नव्हता. फक्त त्यात जे अभावात्मक अंग होते ते तेवढे या अंतर्गत संबंधामुळे स्पष्ट होत होते. नव्या कलेत पैस–संबंधाची जाण कमी होती. नैसर्गिक आकारात जी लवचिकता असते त्या लवचिकतेची जाण कमी होती; आणि चित्रकारितेच्या मूल्याच्या जाणिवेत कमतरता होती. निरनिराळ्या कलाढंगांतील अंतर्गत परस्परसंबंधांचा वर जो आपण धावता आढावा घेतला त्या आढाव्यामुळे पैस–संबंध, आकाराची लयबद्धता आणि चित्रकारिता–मूल्ये यांना नव्या कलेत जो पडता काळ आला त्या पडत्या काळाचा उलगडा होतो. पण नव्या कलेत कलेची अत्यंत गुंतागुंतीची, कृत्रिम सजावटीची शैली होती तिचा उलगडा मात्र त्यावरून होत नाही. कारण सजावटीची ही जी अत्यंत अलंकारिक, गुंतागुंतीची आणि अवास्तव अशी घाटणी होती त्या घाटणीसारखी घाटणी अभिजातवादी किंवा अभिजातवादपूर्व यांपैकी कोठल्याच कालखंडातील कलाढंगात आढळत नाही.

× × × ×

—क्रमश:

•

---

स्वातंत्र्याची इतर काय उद्दिष्टे असतील ती असतील, परंतु स्वातंत्र्याचे एक महत्वाचे उद्दिष्ट हे असते की जेथे स्वातंत्र्य असते तेथे माणसाला त्याच्या केवळ माणूसपणाचाही अभिमान वाटू शकेल अशा प्रकारचे सामाजिक वातावरण तयार झाले पाहिजे. मात्र बहुधा असे घडताना दिसत नाही. माणसे आपण माणूस आहोत याचा अभिमान बाळगण्याऐवजी आपल्या वैयक्तिक व्यवसायाचा अभिमान बाळगतात. कोणी कामगार आहोत याचा अभिमान बाळ- कोणी व्यापारी असल्याचा, बुद्धिमंत म्हणून अथवा अमक्या धर्माचा, राष्ट्राचा, वंशाचा, पक्षाचा सभासद म्हणून अभिमान बाळगताना दिसतो. पण आपण माणूस आहोत याचा अभिमान माणसे क्वचितच बाळगताना दिसतात. ज्या समाजव्यवस्थेत माणसाला आपण माणूस आहोत याचाच फक्त अभिमान वाटू शकत नाही त्या समाजात खरे स्वातंत्र्य नांदत नाही असेच म्हणावे लागते.

—एरिक हॉफर



अनुक्रमणिका

